# विनायकाची कविता

चवथ्या आवृत्तीचे संग्राहक व संपादक
प्रा. भवानीशंकर श्रीधर पंडित, एम्. ए.
मराठी विभागाचे प्रमुख
विदर्भ महाविद्यालय, अमरावती

चित्रशाळा प्रकाशन, पुणें २.

पहिल्या तीन आवृत्त्यांचे संग्राहक व संपादक

**कै० दत्तात्रेय अनंत आपटे ऊर्फ कवि अनंततनय**

चवथी आवृत्ति १९५५



**किंमत तीन रुपये**

प्रकाशक : वा. त्र्यं. जोशी, चित्रशाळा प्रेस, पुणें २

मुद्रक : के. ग. शारंगपाणी, आर्यभूषण मुद्रणालय, पुणें ४

# प्रस्तावना

[ लेखक : कै. **वासुदेव बळवंत पटवर्धन** ऊर्फ **कवि वसंत**,
प्रिन्सिपॉल फर्ग्युसन् कॉलेज, पुणें ]

काय कारण असेल कोण जाणे ! महाराष्ट्रवाङ्मयांत सध्यां काव्यगुच्छांची भर वरचेवर पडत आहे. नवी कविता रोज जन्माला येत आहे आणि नव्या कवींना रोज नवी स्फूर्ति होत आहे. इतकेंच नाहीं तर 'जे झाले गेले' त्यांच्या कवितेचाहि पुनर्जन्म होत आहे. 'भूत' पुनः 'वर्तमाना' प्रमाणें दृष्टीपुढें उभा ठाकत आहे, ही आनंदाची गोष्ट नव्हे असें कोण म्हणेल ! मेलेल्या आप्तेष्टांचें पुनरागमन ज्यांना अनिष्ट आणि भयप्रद होतें असे प्राणी लौकिक जगांत असतील कदाचित्. वाङ्मयविश्वांत तरी असले प्राणी दुर्मिळ असावे अशी माझी समजूत आहे. मला निदान गतांचें पुनरागमन आणि मृतांचें पुनरुज्जीवन काव्यविषयांपुरतें आनंदाचें भरतें आणिल्याशिवाय राहात नाहीं. जें आज दृष्टीसमोर आहे तें निकट सान्निध्यामुळें आणि अतिपरिचयामुळें रोजचें व म्हणून नीरस वाटतें, व त्याची आमच्या हातून अवहेलना होते. आहे त्यांतलें सौंदर्य आम्हांला दिसत नाहीं. जवळच्या मारुतीपेक्षां दहा कोसांवर उंच डोंगरावर बसलेला मारुती आम्हांला अधिक पूज्य वाटतो व त्याचेकडे आम्ही धांव घेतों. प्रत्यक्षापेक्षां परोक्षाची किंमत खरोखरी अधिक असो नसो, सामान्यतः माणसाची प्रवृत्ति हातचें टाकून पळत्याचे पाठीस लागण्याची असते. आजच्या कवींची उपेक्षा होत असल्यास त्याचें कारण मनुष्यस्वभावाच्या या प्रवृत्तींत सांपडेल; परंतु त्याच प्रवृत्तीमुळें कदाचित् मृतकवींच्या काव्यासंबंधानें लोकांना अधिक कौतुक वाटण्याचा संभव आहे. जीं काव्यें, प्रथम प्रसिद्ध झालीं तेव्हां, लोकांना टाकाऊ वाटलीं तीं आतां पुनः प्रसिद्ध झाल्यास सरस ठरणार नाहींत कशावरून ! दर्शनानुशासन शास्त्राच्या नियमाप्रमाणें पदार्थ दूर असला म्हणजे लहान व सुबक दिसतो; पण तोच फार जवळ आला, अगदीं डोळ्याजवळ आला तर विद्रूप दिसूं लागतो. वाङ्मयाच्या प्रांतांतहि तसेंच होत असेल. तें कसेंहि असो. आज महाराष्ट्र काव्यवाङ्मयांत नव्या नव्या काव्यगुच्छांची भर पडत आहे. कित्येक आपलीं काव्यें आपणच पाहून तपासून एकत्र प्रसिद्ध करीत

आहेत, व कालवश झालेल्या कवींची कविता धुंडाळून काढून ती संकलित स्वरूपानें प्रसिद्ध करण्याचे प्रयत्न होत आहेत, ही गोष्ट अनेक दृष्टींनें अभिनंदनीय आहे. अशा प्रयत्नांनीं महाराष्ट्रवाङ्मयाचा, तसाच महाराष्ट्राच्या अभिरुचीचा जिवंतपणा प्रत्ययास येतो. माझे मित्र रा. अनंततनय यांचा हा प्रयत्न त्यांतलाच एक आहे. कै. 'विनायक' कवींची सर्व कविता गोळा करून एकत्र प्रकाशित करण्याचें काम त्यांनीं अंगावर घेऊन पार पाडिलें याबद्दल त्यांचे मी मनापासून अभिनंदन करितों; आणि तें अभिनंदन व्यक्त व्हावें म्हणून त्यांच्या आग्रहास्तव प्रस्तावनेदाखल दोन शब्द लिहितों. वस्तुतः हे दोन शब्द विनायकांच्या कविमित्रां-पैकीं कोणीं तरी, निदान विनायकांशीं नित्य सहवासानें समरस बनलेल्या व समरसतेनें त्यांच्या काव्यांतील रहस्याचा अनुभव घेऊन रंगलेल्या त्यांच्या चिरपरिचित सुहृदानें लिहावयाचे. माझा व विनायकांचा प्रत्यक्ष सहवास कधींच झाला नाहीं. मासिक पुस्तकांच्या द्वारें किंवा इतर मार्गांनीं त्यांच्या काव्याचा मला काय स्वाद घेतां आला असेल तेवढाच. कवितेच्या वाचनानें कवीच्या हृदयाशीं जेवढा सहवास होणें संभवनीय तेवढाच माझ्या वांट्याला आलेला. अर्थात् विनायकांच्या संकलित कवितेला प्रास्ताविक दोन शब्द जोडायास मी पुढें होत आहें तो केवळ अनंततनयांच्या आग्रहामुळें, येवढें आधींच सांगून टाकणें बरें.

१८८० सालानंतर महाराष्ट्रवाङ्मयाला एक नवें वळण लागल्याचें कोणाहि महाराष्ट्रीयास दिसून येण्यासारखें आहे. पेशवाईच्या अखेरीस वाङ्मयाची जी परंपरा पडली ती तशीच बरींच वर्षें पुसट पुसट कायम होती. विशेषतः काव्य-वाङ्मयावर तरी मोरोपंत आणि रामजोशी यांनीं घातलेला ठसा पेशवाई मावळल्यानंतर कित्येक वर्षें कायम होता. १८५० पासून सुमारें १८८० पर्यंत महाराष्ट्रांत झालेलीं काव्यें पाहिलीं म्हणजे त्यांवर वरील परंपरेची छाया पडलेली असल्याचें स्पष्ट दिसेल. १७९५ ते १८२० पर्यंतचा काळ आणि १८५० ते १८८० पर्यंतचा काळ यांत वाङ्मयदृष्टीनें महदंतर असलें तरी त्यांतलें वळण जवळजवळ एक होतेसें वाटतें. नवीन काव्यरचना करितांना दृष्टि मयूर-काव्याच्या प्रौढते–प्रगल्भतेकडे आणि चमत्कृतिजनक शब्दयोजनेकडे असावी

वयाची आणि नवी रचना जुन्या मोरोपंती रचनेशीं तंतोतंत जुळती ठेवणें— इतकी कीं, मोरोपंताचीच आहे असा भास व्हावा—हें कवीचें ध्येय असायाचें. १८५० पासून १८८० पर्यंतच्या काव्यरचनेंत मोरोपंती वळण आधाराला असलें तरी त्या वेळच्या वाङ्मयांत मोरोपंती काव्यांत नाहींत असे विशेष पुष्कळ आहेत. मोरोपंतांच्या कावितेचे झरे एका संस्कृतांतुन आलेले होते. एकोणिसाव्या शतकाच्या तिसऱ्या चरणांत त्या झऱ्याबरोबर अगदीं नवे प्रवाह महाराष्ट्रांत वाहूं लागले होते, व या नव्या ओहोळाचें पाणी जुन्या पाटांत आणून सोडण्याचें काम कित्येक कवि भीत भीत करूं लागले होते. तथापि नव्या पाण्यानें जुन्याला अजून आत्मसात् केलें नव्हतें, किंबहुना नव्याला जुन्यापुढें वाहतांहि येत नव्हतें. कवींची अभिरुचि, कवींची ओढ, कवींची आकांक्षा जुन्यालाच खिळलेली होती. जुन्या वळणावरच पण अधिक घोटींव, जास्त सफाईदार, विशेष कुशलतेचें काम करून दाखवायची हाव तत्कालीन काव्योपासकांची होती.

पण १८८० नंतर महाराष्ट्रकाव्याचें रूप पालटलें. इंग्रजी कवितेंत जें विशेष आढळतें तें महाराष्ट्रकवितेंत आलें पाहिजे, आढळलें पाहिजे ही जाणीव कवींच्या कृतींत दिसूं लागली. भाषेच्या चमत्कारापेक्षां अर्थाच्या चमत्काराचें, त्यांतहि बुद्धीला गुदगुल्या करणाऱ्या रचनेपेक्षां अन्तःकरण हलविणाऱ्या रचनेचें महत्त्व कवींना अधिक वाटूं लागलें; कसरती करण्याचें वेड होतें तें गेलें. कृत्रिम डामडौलाला कवि नाक मुरडूं लागले. पण सहज सौभाग्याला आळवूं लागले. सभोंवारचें जग, भोंवतीं होणाऱ्या घडामोडी, ऐहिक व्यवहारांच्या अवगुंठनांत लपलेल्या अंतःस्फूर्ति वगैरे गोष्टींनीं कवि-हृदयें हलूं लागलीं. काव्याचे विषय बदलले, वृत्त बदललें, ध्येय बदललें, भाव बदलले, थाट बदलले; सारांश काव्याचें स्वरूप इतकें भिन्न झालें कीं, हें काव्यच नव्हे असें रसिकंमन्य म्हणूं लागले. मराठी कविता मराठ्यांप्रमाणें, आणि मराठ्यांबरोबर नवे ढंग करूं लागली आणि नवे खेळ खेळूं लागली. पूर्वपरंपरेनें एकदेशी बनलेल्या रसिकांस तें पाहवेनासें झालें. नाकांत नथ नाहीं, कानांत कुड्या-बुगड्या नाहींत, डोकींत सोन्याचीं फुलें नाहींत, अंगांत भरगच्ची चोळी नाहीं, सर्वांग उंची पण अति तलम-नरम वस्त्रांनीं शोभविलेलें नाहीं, आणि चालण्याबोलण्यांत ठरीव पद्धतीचा

ठसका नाहीं, अशी हीं नवी कविता महाराष्ट्राला ओळखूं येईना. महाराष्ट्राची कविता नागरजनांस नागर चेष्टांनीं आणि नागर भूषणांनीं मोहून टाकणारी, गर्भश्रीमंतींत वाढलेली, पोक्त होती. ती एखाद्या खेडवळ पोरीसारखी साधी, सरळ, भाबडी, मनांत येईल तें बोलून टाकणारी, जाडें-भरडें नेसून निःशंकपणें वावरूं गाऊं लागलेली पाहून महाराष्ट्रांतील पंडित आणि शिष्ट नाकें मुरडूं लागले. तथापि संस्कृत वाङ्मयाच्या जोडीस इंग्रजी वाङ्मयाशीं ज्यांचा परिचय झाला होता आणि ज्यांचीं हृदयें बुद्धीच्या दडपणाखालीं चिरडून गेलीं नव्हतीं असे कांहीं रसिक महाराष्ट्रांत होते. त्यांनीं या साध्या पण सहजसुंदर कवितेचा अव्हेर केला नाहीं. त्यांनीं तिच्या सरळपणाचें आणि बाललीलांचें कौतुक केलें. पण असे रसिक किती थोडे होते ! इतके थोडे कीं, केशवसुत, टिळक, विनायक वगैरे कवींच्या काव्यांत लोकांच्या अरसिकतेसंबंधानें विषादाचे उद्गार निघावे ! विनायकाचे पुढील उद्गार पाहा:—

**‘ असते गुणभोक्ते जर नगरीं चतुरा, तर कां गुणी**
**हिंडते भ्रमिष्टापरी वनीं ।**
**मज हाल पुराची काय पांखरा कळे**
**परि वदती नगरीं अज्ञानचि कोंदलें**
**रसिकता सर्व करपली मत्सरानलें**
**होईल मुका ऐशा स्थानीं जातां वाचस्पती**
**पाड तो मज गरिबाचा किती ॥ १ ॥**

हे उद्गार कवीनें एका पोपटाच्या तोंडीं घातले आहेत. काव्याचा विषय निराळा आहे. ‘ कवि आणि पोपट ’ हें त्या काव्याचें नांव आहे. पोपट नुसता नांवाला आला आहे. संवादाच्या मिषानें आणि पोपटाच्या तोंडानें कवीला आपल्या मनाची तळमळच ओकून टाकावयाची आहे. काव्य मूळ इंग्रजी असावेंसें वाटतें. त्याचें विनायकानें रूपांतर केलेलें असावें. पण कवीच्या मनाला ज्या गोष्टी झोंबलेल्या होत्या, ज्यांची टोंचणी त्याच्या हृदयांत सारखी लागली होती, जळीं-स्थळीं-काष्ठीं-पाषाणीं जें त्याला दिसत होतें, ज्याच्या खडतरपणाचें भेसूर चित्र तो स्वतांच्या व स्वदेशाच्या आयुष्यभर पाहून विषण्ण

झाला होता, तें पारतंत्र्य आणि त्या पारतंत्र्यानें कवीची, तशीच कवीच्या लोकांची व देशाची केलेली दुर्दशा, यांना त्या काव्यांत वाचा फुटलेली आहे. नाहीं तर पोपटाच्या तोंडीं 'रसिकता मत्सरानलें' करपल्याचा उल्लेख कां येता? अरसिकतेच्या कुंपणानें कवीच्या प्रतिभेला प्रतिबंध कितपत झाला हें कळायाला कविचरित्रांत फारसा मार्ग नाहीं; मला अनंततनयांकडून आणि इतर कांहीं मित्रांकडून विनायकाच्या चरित्राची जी माहिती उपलब्ध झाली तींत तरी कांहीं आधार दिसत नाहीं. परंतु त्याच्या मित्रांना जें माहीत नाहीं, जें कोणाला दिसलें नाहीं तें कवीच्या काव्योद्धारांत बाहेर पडल्यानें, स्थलकालादींचा पत्ता लागला नाहीं तरी जगाच्या अरसिकतेनें, अज्ञानानें, अहंपणानें आणि मत्सरानें कवीला वैताग आला असल्याचें स्पष्ट होत आहे. कवि म्हणतोः—

**मात्सर्याचा भरला वारा,**
**अहंपणाचा सर्व पसारा,**
**अज्ञानाची मिरवे द्वाही,**
**रसिकत्वाला थारा नाहीं,**
**काय अशा जनतेंत रहावें?**
**काय पहावें? काय चहावें?**
**बरें राहणें निर्जन रानीं,**
**ओढ्यासंगें गाणें गाणीं ॥ १ ॥**

ही जगाची अरसिकता जगाच्या पारतंत्र्याचेंच एक फळ होतें. भोंवतालचें जग परतंत्र, परवश झाल्यानें स्वतंत्रतेसाठीं आसुसलेला कवि अधिकच तळमळावा, आणि परावलंबनाचे विषमय परिणाम त्याला अधिकच प्रतीत व्हावे यांत नवल नाहीं. त्याच्या हृदयाला इंगळ्या टोंचल्याप्रमाणें वेदना होत असाव्या. स्वजन, स्वदेश—आपलें पूर्व विसरून, 'परांवर सारी भिस्त' ठेवून स्वत्वाला पार मुकलेले पाहून विनायकाला चैन पडत नसावें. परवशतेमुळें ओढविलेल्या लाजिरवाण्या स्थितीचें चित्र त्याच्या काव्यांत वारंवार रेखाटलेलें आढळतें. भोंवतालीं दिसणारी आणि स्वतांच्या नित्य प्रत्ययास येणारी अवनतीच विनायकाची दृष्टि वर्तमानावरून भूतकाळाकडे वळण्यास कारण झाली कीं काय कोण जाणे! त्याच्या अंगीं मराठी

साम्राज्याच्या स्वतंत्रतेचें वारें खेळत असावें ! निदान त्या संस्मरणीय गतकाला-संबंधीं त्याला विलक्षण प्रेम वाटत असे यांत संशय नाहीं. "पूर्व दिव्य ज्यांचें त्यांना रम्य भाविकाळ" हा विश्वास त्याच्या हृदयांत दृढ नसता तर विनायकाची सर्व कविता पारतंत्र्याच्या करकोच्यांनीं जर्जर झालेल्या महाराष्ट्रभूच्या आर्तस्वरांनीं आणि हुंदक्यांनीं गहिंवरलेली आढळती; पण तशी ती नाहीं. त्याच्या प्रतिभेची दृष्टि महाराष्ट्राच्या दिव्य पूर्वावर खिळलेली असल्यामुळें महाराष्ट्राचें भवितव्यहि त्याला उज्ज्वलच दिसत असे. त्यामुळें तत्कालीन परवशतेनें, दारिद्र्यानें, परावलंबनानें अंतःकरणाला घरे पडत असतांहि तो लोकांच्या नांवानें खडे फोडीत आणि भिंतीवर डोकें आपटीत राहिला नाहीं. सद्यःस्थितीच्या दिखाऊ लखलखाटानें दिपलेल्या आणि भान विसरलेल्या जनतेला पूर्वीची आठवण देणें हें त्याच्या कवितेनें आपण होऊन अंगावर घेतलेलें काम होतें आणि तें तिनें आपल्या आवांक्याप्रमाणें केलें, हें कोणासहि कबूल करावें लागेल. विनायकाची बहुतेक कविता त्याच धोरणाची आहे. या दृष्टीनें विनायकाची कविता म्हणजे तत्कालीन महाराष्ट्राचें प्रतिबिंब होय. 'शिवाजी उत्सव,' 'महाराष्ट्राच्या इतिहासाचीं साधनें' गोळा करण्याचा उद्योग, वगैरे चळवळींचा उदय विनायकाच्या देखत झाला. त्यांचा पडसाद त्याच्या काव्यांत उठल्यासारखा दिसत आहे. या चळवळींमुळें विनायकाची कविता जन्म पावली असें नव्हे; परंतु त्याची कविता आणि त्या चळवळी या सर्वांचें उगमस्थान त्या वेळची महाराष्ट्राची लौकिक अवस्था होय असें म्हणावयास हरकत नाहीं. म्हणजे एका अर्थी विनायक हा काळमाहात्म्याचा परिपाक आहे. त्या वेळच्या जनतेंत अस्फुटपणें जे विचार, जे भाव, ज्या मनः-प्रवृत्ति जागृत होत होत्या त्यांना विनायकानें तोंड फोडिलें. विनायक हा तत्कालीन जनतेचा वाचस्पति होता. त्याच्या काव्याचे द्वारां त्या वेळची लोक-स्थिति गाऊं किंवा बोलूं लागली.

महाराष्ट्रभूच्या नष्टदशेचें चित्र विनायकानें जसें रेखाटलेलें आहे तसें त्या वेळच्या काव्यवाङ्मयांत क्वचितच दृष्टीस पडेल. विनायकाची 'हतभागिनी' महाराष्ट्रीयांच्या अन्तःकरणास पीळ पाडिल्यावांचून राहणार नाहीं. विशेषतः ज्या एका दोषानें महाराष्ट्राचें वाटोळें झालें तो दोष विनायकानें नेमका दाखविलेला

पाहून जिवंत हृद्याच्या माणसाला क्षणभर तरी थबकल्यावांचून पुढें जाववणार नाहीं ! ज्या महाराष्ट्रभूच्या डोळ्यांतून एक अश्रुबिंदु पडला तर तिचें दुःख हरण करण्यासाठीं, रणावर रणें झुंजणारे तिचे पूत तिच्या चालत्या काळीं अहमहमिकेनें पुढें सरसावत त्या महाराष्ट्रभूमींत आज––हाय !

**‘कारटीं करंटीं तिथें**
**निपजलीं भुतें ! मातृशोणितें**
**स्वतांला लाली–आणाया धांवलीं !**
**कल्याण काय नेणतीं**
**नित्य भांडतीं, आपसांत तीं,**
**परां वश झालीं–स्वत्वाला विसरलीं. ’**

हे विनायकाचे उद्गार विनायकाचे काळीं तर खरे होतेच होते. आज तरी ते खोटे पडले आहेत काय ? मग विनायकाचे पुढचे उद्गार

**गेले दिन यावे कसे**
**वर्तनें असे ? एकदां फसे**
**गाय जी गाळीं–चेपत ती चालली.**

हे आजला कां लागूं पडूं नयेत ? ‘ बुडत्याचा पाय खोलांत ’ म्हणतात तशी बिचाऱ्या महाराष्ट्राची अजूनहि स्थिति नाहीं काय ? विनायका ! तुझ्यासारखे—किंबहुना तुझ्याहून तीव्र हृदयाचे, तीव्रतर भावनांचे आणि तीव्रतम शब्दसामर्थ्याचे कवि जन्माला येऊन महाराष्ट्राला आपल्या आक्रोशांनीं–कठोर वचनांनीं आणि मर्मभेदी शरसंधानांनीं खडबडून जागें करितील तो सुदिन ! तो उगवेल तेव्हां खरा !

‘ हतभागिनी ’ ला जसा आशेचा किरण दिसत नाहीं तसाच ‘ यापुढें ’ हि विनायकाला दिसत नाहीं. हीं दोनहि काव्यें विषण्ण मनाची आर्त वाणी आहे. ‘ जें कांहीं उत्तम होतें तें गेलें ! आतां काय राहिलें आहे ! कपाळकरंटें ! ’ अशा वृत्तीचे दीनोद्गार या दोन काव्यांत आहेत. विनायकाची ही नेहमींची वृत्ति नव्हे. तो आनंदी, प्रसन्न, ताज्या दमाचा गडी होता. आभाळांत उडणाऱ्या

प्रस्तावना

पांखरासारखा स्वच्छंदी प्राणी—निराशेनें चूर होऊन बसणारा नव्हे. वेळ पडली तर स्वतांचीं गाणीं म्हणून पोटाला मिळवील, पण उपाशीं मरायचा नाहीं. अशाहि माणसाच्या वृत्ति उदास होऊन तो रडकुंडीस यावा ऑं! हिंदुस्थानाव्यतिरिक्त कोणत्या देशाच्या इतिहासांत अशा स्थितीला तोड सांपडेल? शिवाजी, रामदास, धनाजी, बाजी, भरारी, फडणवीस नाना, यांसारखे नाना गुणांचे आणि नाना कर्तबगारीचे पुत्र एका काळीं महाराष्ट्रांत उदयास यावे! पण यापुढें? यापुढें तसा संभवहि उरूं नये! प्रसंगाच्या अभावामुळें उपजत बुद्धि जागच्या जागीं जिरावी आणि एका काळीं सोन्याचा तुकडा ठरलेली महाराष्ट्रभू आज रेताड वाळवंटाहूनहि नादान व्हावी अं!

पण विनायकाच्या काव्यांत ही निराशेची दाट छाया तेवढ्या दोन ठिकाणीं दिसते. 'प्रोफेसर छत्र्यांचा केसरी' व 'दसऱ्याचें सोनें' यांचा सूर तोच आहे, तरी त्यांत निराशेपेक्षां खेदच अधिक आहे. स्वातंत्र्याचा शाहीर या नात्यानें त्याच्या बाकीच्या काव्यांत उमेदीचे, उत्साहाचे शब्द ऐकूं येतात. 'महाराष्ट्र-लक्ष्मी,' 'इतिहासाचें मर्म,' 'शिवराजदर्शन,' 'शिवसंदेश' हीं सर्व काव्यें स्वातंत्र्याचीं गाणीं आहेत. यांतहि आजची परतंत्रता आणि पूर्वीची स्वतंत्रता यांतील विरोध स्पष्टपणें रंगविला आहे, पण या सर्वांची अखेरी धीर देणारी आहे. "उद्योग करा, प्रयत्न सोडूं नका, स्वातंत्र्यक्षम व्हा, म्हणजे 'केल्या उद्योगाचे,... केव्हां तरी घडे चीज'" असें तीं काव्यें बजावून सांगत आहेत.

विनायकाच्या कवितेचा एक भाग मुद्दाम वाचण्यासारखा आहे. विशेषतः स्त्रीवर्गाला तो भाग फार आवडेल. मंगळागौरीच्या कहाण्यांबरोबर, अहल्या, पन्ना, पद्मिनी, राणी दुर्गावती, संयोगिता, तारा, कृष्णाकुमारी, वीरमती वगैरे गाणीं व कविता जर आमच्या तरुण मुलींच्या तोंडीं बसतील तर महाराष्ट्राच्या तेजस्वी स्त्रीचारित्र्याचे आरसे त्यांच्या दृष्टीपुढें नित्य राहतील आणि शाळांतील इतिहासांमधून जें मिळावयाचें नाहीं तें खऱ्या महाराष्ट्र स्त्रीचें बाळकडू त्यांना आपोआपच मिळेल. कधीं न ढळणारा करार, न भंगणारा निर्धार, न वांकणारा स्वाभिमान, आणि पुरुषांसहि लाजविणारा पराक्रम एका काळीं आमच्या बायकांत होता, याची साक्ष वरील काव्यांच्यायोगें पटते. विनायकाचीं हीं गाणीं

बोधपूर्ण आहेत. विनायकाचें पूर्वेतिहासावरील प्रेम स्त्रीपराक्रमाच्या आणि स्त्री-यशाच्या गीतांच्या रूपानेंच प्रकट झालें. याचें कारण काय असेल कोणाला ठाऊक ? पुरुषस्वभावाच्या चंचलतेसंबंधानें या गाण्यांत ठिकठिकाणीं विनायकानें उल्लेख केला आहे, आणि एकनिष्ठ स्त्रीस्वभावाचे तर तीं गाणीं म्हणजे जिवंत ठसे आहेत. कवीच्या अनुभवांचें सार आणि चरित्राचें रहस्य या ठिकाणीं सांठविलेलें असेल काय ? विनायकाच्या डोळ्यांच्या जादुगिरीचा प्रभाव दाखविणारे व स्त्रीविषयक चंचलतेची चहाडी करणारे प्रसंग त्याच्या चरित्रांत जितके आले त्यांपेक्षां त्याच्या नेत्रांची मोहिनी जेथें निष्फल झाली, आणि त्याच्या स्वभावाच्या चंचलतेची जेथें डाळ शिजली नाहीं असले प्रसंगच अधिक आले असतील काय ? कोणास ठाऊक ! काळाच्या उदरांत गडप झालेल्या रहस्यांचें आकलन कोण करणार ? एवढें सिद्ध आहे कीं, विनायकानें ऐतिहासिक पुरुषांपेक्षां ऐतिहासिक स्त्रियांचें यशोगान फार केलें, आणि त्यांच्या शीलाच्या ओजस्वितेचें प्रेमानें कौतुक करण्यांत व तिचीं स्तोत्रें गाण्यांत त्याला परमानंद होत असे. कदाचित् महाराष्ट्रांतील पुरुषांपेक्षां महाराष्ट्रांतील स्त्रियांवरच त्याच्या आशेची भिस्त अधिक असेल ! कदाचित् पुरुष चुकले भुलले तर भुलोत बेटे ! त्यांना ताळ्यावर आणायाला, त्यांचे डोळे उघडायाला, महाराष्ट्रांतील स्त्रिया तरी स्वतांचें तेज, स्वतांचें ओज, स्वतांचें शील, आणि स्वतांचें स्वत्व संभाळून राहोत, ही त्याची उत्कट इच्छा असेल ! कदाचित् स्त्रीजातीच्या प्रेमवशतेविषयीं त्याचा अनुभव त्याला सांगत असेल कीं, उपदेशाची जरूर त्याच बाजूला विशेष आहे ! पण तसें असतें तर त्याच्या इतर काव्यांत कोठें ना कोठें तरी स्त्रीसंबंधानें अनुदार उद्गार आढळले असते. तसे ते कोठेंच फारसे आढळत नाहींत. उलट जेथें जेथें विनायक स्त्रीसंबंधानें गातो तेथें तेथें त्याची वृत्ति आदरानें आणि पूज्यभावानें नम्र झालेली दिसते. तेव्हां उपदेशाची विशेष गरज त्या बाजूला आहे असें त्यास वाटत असण्याचा संभव कमी. स्त्रीजातीला उपदेश करण्याचें धाडस त्यानें कोठेंहि उघडपणें केलें नाहीं. पुरुषवर्गाला मात्र वरचेवर कोरडे ओढण्याला त्यानें कमी केलें नाहीं. पुरुषांच्या शीलासंबंधानें त्याचें मत इतकें प्रतिकूल कां कोण जाणे ! त्यांना नीतिपाठ शिकविण्याचा किंवा स्पष्टोक्तीनें टोंचण्याचा एकहि प्रसंग तो वांया जाऊं देत नाहीं !

**‘ जो परनारीचा मनीं धरी अभिलाष ।**
**होईल यशाचा लाभ कुठून तयास ’ ॥ १ ॥**

× × × ×

**‘ स्त्रीच्या ठायीं दलपतसम जो होतो लंपटमती ।**
**जीवित्वाला, सर्वस्वाला मुकतो तो शेवटीं ’ ॥ १ ॥**

× × × ×

**‘ काय होय तें परि पुरुषाला,**
**नव पुष्पावरच्या भ्रमराला ’ ॥ १ ॥**

× × × ×

**‘ स्त्रिया भावड्या जगतीं कपटी पुरुषांची जाती. ’**

यांसारखे उद्गार त्याच्या काव्यांत जागोजाग ऐकूं येतात. यांत विनायकाच्या अंतरंगाचें प्रतिबिंब दिसत असेल काय ? फुलपांखराप्रमाणें दिसल्या फुलावर झडप घालण्यासाठीं ओढ घेणारें त्याचें बाहेरचें मन आणि समाजाला आधारभूत झालेल्या अंतःकरणप्रवृत्ति ज्यांत जिवंत होत्या तें आंतलें मन यांतील द्वंद्वयुद्धाचें निदर्शन त्यांत होत असेल काय ? तसें असेल तर विनायकाची शिकवण आणि विनायकाचें लौकिक चरित्र यांतील विरोधाचा उलगडा चांगला होईल आणि पापभीरु, रसिक व सोंवळे कविमित्र यांना विनायकासंबंधानें बोलतां–लिहितांना जें संकट पडतें तें पडण्याचें कारण उरणार नाहीं !

या बाबतींत देखील विनायक आणि त्याच्या वेळची सामाजिक स्थिति यांचा अन्योन्य संबंध दिसतो. विनायकाचे वेळीं महाराष्ट्रीय जनतेचें जीवित दुहेरी होतें. महाराष्ट्राचें लौकिक चारित्र्य आणि खासगी दिनचर्या यांत फारकत पडली होती. सामाजिक व राजकीय पुढाऱ्यांचें वर्तन घरांतलें एक आणि बाहेरचें एक होत असे. मन एक सांगे आणि जन एक सांगे अशा कैचींत महाराष्ट्र जनता सांपडली होती. जनांतलें महाराष्ट्र आणि मनांतलें महाराष्ट्र वेगवेगळीं पडत. महाराष्ट्राच्या संसाराचा हा दुरंगी वेष सामाजिक व राजकीय पुढाऱ्यांच्या चरित्रांत स्पष्ट दिसेच दिसे. पण

महाराष्ट्राच्या वाङ्मयांतहि तो उमटलेला विनायकाच्या कवितेमुळें स्पष्ट होतो. विनायकाचें लौकिक चरित्र आणि अंतःस्थ चरित्र यांतील विरोध म्हणजे त्या वेळच्या महाराष्ट्राचें प्रतिबिंब होय, असें पर्यायानें म्हणतां येईल. एका अर्थी हा विरोध कदाचित् नुसता विरोधाचा भासच आहेसें दिसून येईल. त्यावरून जर कांहीं सिद्ध होत असेल तर तें इतकेंच कीं, विनायक जात्या कवि होता; त्याचें अंतःकरण कवीचें होतें, त्याच्या वृत्ति–प्रवृत्ति कवीच्या, भाव-भावना कवीच्या होत्या; परंतु त्याचें मनोबल त्या वेळच्या समाजाचें होतें. त्याच्या ज्ञानेंद्रियांवर होणाऱ्या प्रत्येक आघातानें त्याचें हृदय थरारे. रमणीयता कोठेंहि दिसो तो तिला मोहून जाई; माधुर्य कोठेंहि आढळो त्याचा जीव लालचावे. हृदयाची अलौकिक कोमलता, अंतःकरणाची संस्कारक्षमता, हा कवीच्या प्रकृतीचा विशेष असतो तो विनायकांत होता, हेंच त्याच्या लौकिक चरित्रावरून स्पष्ट होतें. रंगाच्या सान्निध्यानें रंगणारी त्याची वृत्ति असल्यानें सुंदर वस्तूकडे त्याचे डोळे ओढ घेत, मधुरालापांनीं त्याचे कान टवकारून उभे होत, आणि त्या मोहाचा प्रभाव त्याच्या अन्तःकरणावर इतका होई कीं, त्याचें भान क्षणभर नष्ट होई, तो वेड्याप्रमाणें त्या त्या विषयाचे मागें धांवे. हें लक्षण कवीचेंच होतें. परंतु कवीच्या प्रतिभेची पोंच आणि झेंप याचे पलीकडे जाते. ती दिसणाऱ्याच्या मागें आणि ऐकूं येणाऱ्याचे पलीकडे काय आहे याचा थांग लावीत असते. तो लागल्याविना, तळ सांपडल्याविना तिला चैन पडत नाहीं. बाह्य जगाकडून इंद्रियांवर उठणारे ठसे सांठवावे व त्यांचें यथावत् प्रतिबिंब मनापुढें व क्रमानें जनापुढें उभें करावें हा कवित्वाचा नुसता ओनामा आहे. पहिल्या प्रतीच्या कवित्वाला तेवढें पुरत नाहीं. त्याची धांव फार मोठी. ती जेथें असेल तेथें चलत्या–फिरत्या विश्वाच्या चित्रांपेक्षां असत्या-जागत्या विश्वाचेंच चित्र पाहावयास मिळतें. निःशब्दाचे ध्वनि आणि अदृष्टाचें दृश्य तेथें अनुभवास यावयाचें. विनायकाची कविता या परावाणीच्या व परावस्तुच्या प्रदेशाकडे फारशी झुकली नाहीं. कदाचित्, तिला क्वचित् क्वचित् त्याचे ओझरते भास होत असतील, झाले असतील, पण त्या प्रांतांत तिचा प्रवेश झाला नसावा. त्या प्रदेशाच्या कांठाकांठावर ती कधीं कधीं चाचपडत असेल. नाहीं तर—

स्वानुभूत वासाचें दान
करावयाला जोंवर ये न
तोंवर कवितालतिकेवरती
कर्णिकार सुमनांची भरती

किंवा

उडती बागडती पक्षी, तत्परता ठेवुनि भक्ष्यीं
गाती ब्रह्मानंदानें, सृष्टीनें रचिलें गाणें
भाव तयांचे वळखावे, शब्दरूप त्यांला द्यावें
तोच कवी ज्या ही क्षमता, मी गणमात्रा वर्तविता

किंवा

महाकवी थोर नदाप्रमाणें
मी बापडा ओघळ अल्प जाणें
धाकें न ओढा झुळझूळ वाहे
माझी तशी ही गुणगूण आहे.

हे उद्गार विनायकानें काढिले नसते. विनायकाच्या तीन चार काव्यांचा रोख त्याच्या इतर काव्यांच्याहून अगदीं भिन्न आहे. 'प्रीति निमाली तर', 'सुवास', 'स्त्री आणि पुरुष' हीं तीन विनायकाचीं आहेत अशी खातरजमा रा. अनंततनय देतात म्हणून, नाहीं तर तीं केशवसुतांच्या काव्यांत मिसळून जातीं.* या काव्याची भाषा, छंद, अर्थव्यक्तीची पद्धत, व्यक्तांतून निघणारा अव्यक्ताचा ध्वनि आणि या सर्वांहून विशेष यांत दिसून येणारी क्षुण्णमार्गाविषयीं बेपर्वाई विनायकाची नेहमींची नव्हे. शब्द साधे पण अर्थ पूर्णपणें व्यक्त करणारे योजायाचे, छंदःसुलभ रचना करावयाची, वाचकाच्या दृष्टीला किंवा मनाला किंवा अंतःकरणाला ठेंचा खाऊं न देतां सुखानें प्रतिपाद्य विषयाच्या अखेरीस पोंचवावयाचें ही त्याची नित्याची रीत आहे. त्याच्या काव्याचें वृत्त बहुधा लोकाभिरुचीला मान्य झालेलें, निदान तिच्या नित्य परिचयाचें असतें. आर्या, साकी, दिंडी, शार्दूलविक्रीडित किंवा कांहीं

---

* या कविता काव्यरत्नावलीच्या अंकांतून प्रसिद्धि पावल्या असून डिसेंबर १८९९ च्या अंकांत 'सालअखेर' या सदरांत त्यांची स्तुति आहे.

लावण्यांच्या चाली यांबाहेर ते फारसे जात नाहींत. परंतु 'सुवास' आणि 'स्त्री आणि पुरुष' या काव्यांचीं वृत्तें अगदीं नवीन, निदान त्या कालाला फारशीं परिचित न झालेलीं आहेत. 'प्रीति निमाली तर' शार्दूलविक्रीडित वृत्तांतच आहे, पण तें खरें खरें शार्दूल-विक्रीडित आहे. अतीन्द्रिय रहस्याची झांक 'सुवासांत विशेष आहे', तर 'स्त्री आणि पुरुष' या काव्याची कोमल–मनोहर–सूचकता बहारीची आहे. त्याच्या आटपशीरपणानेंहि त्याच्या मोहकतेंत कमी भर घातली आहे असें नाहीं. एकंदरींत हीं तीन काव्यें विनायकाचीं नाहींत असें कोणी सिद्ध करील तर विनायकाच्या दृष्टीनें मला अत्यंत वाईट वाटेल, पण केशवसुतांच्या कवितेंत भेसळ झाली असें वाटणार नाहीं.

विनायकाच्या काव्यांत क्वचित् का होईना, केशवसुतांच्या कवितेचा सूर ऐकूं यावा याला कारण त्यांचें साहचर्य किंवा परस्पर प्रेम, किंवा काव्यपरिचय असेल कदाचित् ! परंतु मला त्याचें कारण निराळेंच वाटतें. मला वाटतें १८८० पासून आतांपर्यंतचा काळ म्हणजे महाराष्ट्र काव्यवाङ्मयाच्या नव्या मनूच्या महोदयाचें– सूर्योदयाचें तांबडें फुटल्याचा आहे. हा उषःकाळहि म्हणतां येणार नाहीं. उषःकाळाचीं पूर्व चिन्हें स्पष्ट दाखविणारी ती पहाट आहे. महाराष्ट्राच्या अंगांत नवें रक्त सळसळूं लागल्याचें, नवें वारें भरूं लागल्याचें—क्वचित् भणभणूं लागल्याचें, महाराष्ट्राची दृष्टि फिरल्याचें आणि महाराष्ट्राच्या प्रतिभेला नवीं स्वप्नें दिसूं लागल्याचें, नवे भास होऊं लागल्याचें आणि नवीनच विश्व सांपडल्यानें होणाऱ्या नवीन अननुभूत प्रत्ययाचें हें लक्षण आहे. लहान मुलाला प्रथम वाचा फुटतांना जसें त्याचें होतें तसें महाराष्ट्राचें या काळांत झालें आहे. मनांत अर्थ पुष्कळ आहे, हृदयांत चैतन्य तुंबलेलें आहे, ओठ फुरफुरताहेत, जीभ लवलव करीत आहे; पण स्पष्ट प्रस्फुट वाणी बाहेर पडत नाहीं. नैसर्गिक अडचणींच्या जोडीस कुंद आसमंत आणि गुदमरून टाकणारें वातावरण मिळाल्यामुळें महाराष्ट्राची नवी कविता कोठें तुरळक—इथें—तिथें—अशी क्वचित् कदाचित् बोलते.

अशा स्थितींत तत्कालीन कविवर्गांत विनायकाची जागा कोणती या प्रश्नाचें उत्तर देणें कठिण आहे. तथापि त्याच्या संबंधानें एक विधान बिनदिक्कत करितां

येईल कीं, अगदीं नीरस कविता त्यांनीं लिहिली नाहीं. कविता करावयाची म्हणून केलेली कविता त्यांची कोणतीच नाहीं. मनुष्याच्या अंतरंगांतील गूढ प्रदेशांत बुड्या मारून तेथील रत्नें त्यांनीं शोधून आणिलीं नसलीं, किंवा सांताच्या कुंपणा-वरून पलीकडे उडी मारून अज्ञाताच्या—अज्ञेयाच्या रहस्य प्रदेशांतील निगूढ गाणीं त्यांनीं ऐकिलीं—ऐकविलीं नसलीं तरी लौकिक जगांतील आणि लौकिक भावांतील सर्वमान्यवृत्तींचीं आणि सत्यांचीं गोड गीतें त्यांनीं गाइलीं आहेत. विशेषतः महाराष्ट्राच्या दिव्य पूर्वेतिहासाची आठवण त्यांनीं महाराष्ट्राला करून दिली आहे आणि महाराष्ट्राच्या स्त्रीवर्गापुढें ओजस्वितेचे आदर्श ठेविले आहेत. 'चिमा', 'प्रीति निमाली तर', 'सुवास' आणि 'स्त्री आणि पुरुष' यांत त्यांच्या काव्यशक्तीची परिसीमा झाली आहे. त्यांची स्वातंत्र्याची लालसा आणि परवशतेचा—गुलामगिरीचा—तिटकारा त्यांच्या काव्याचे द्वारां वाचकांचे हृदयांत पडसाद उठविल्याशिवाय राहणार नाहींत. त्यांच्या अंगीं थोडक्या शब्दांनीं एखादा देखावा, एखादा प्रसंग, एखादें सृष्टिसौंदर्याचें निवासस्थान डोळ्यापुढें उभे करण्याची शक्ति मोठी होती. तरीहि इंग्रजी वाङ्मयाशीं त्यांचा झाला होता त्यापेक्षां अधिक विस्तृत आणि निकट परिचय झाला असता तर बहार झाली असती असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. विनायकासारखे कवि प्रसादचिन्ह म्हणून महत्त्वाचे आहेत. तबल्यावरची थाप आणि तंबुऱ्याच्या तारेचा शब्द म्हणजे गाणें नव्हे. गवयाच्या गाण्याचा भर आणि खरा रंग पुढेंच असतो. पण तो यायला आणि त्यानें रसिक वर्गाला डोलूं लावायाला त्या थापेची आणि त्या तारेच्या शब्दाची अत्यंत जरूर असते. यांच्यावांचून त्याचा उदयच व्हायाचा नाहीं. केल्यापेक्षां करावयाची, झाल्यापेक्षां होणाराची, ज्ञातापेक्षां ज्ञेयाची मातबरी मोठी खरी. पण ती केव्हां ? केलेलें, झालेलें आणि ज्ञात हातांत असेल तेव्हां. कळीपेक्षां फुलाचा मान अधिक होईल. पण पुढच्या फुलासाठीं कळीची जोपासना आणि कळीचें कौतुक केल्यावांचून मनुष्याला राहवेल काय ? किंबहुना कळीची जादूच पुष्कळदां अधिक मोहक असते. तिच्या पोटीं अनंत विश्व भरलेलें असतें. या दृष्टीनें विनायकासारख्या कवींची कविता वाचिली असतां महाराष्ट्राच्या व महाराष्ट्र-वाङ्मयाच्या भवितव्यतेविषयीं निराश होण्याचें कारण उरणार नाहीं.



# विनायकाचें चरित्र

**' माझें *चारित्र इतकें विचित्र आहे कीं, कोणीं ( ऐकूं नये ); ऐकिल्यास माझी कविता तो वाचणारच नाहीं, तरी चरित्र हवें असल्यास कविता पाठवितां येत नाहींत ! "**

**—विनायक**

प्रतिबंध केला कीं, त्यांतून निसटण्याचा प्रयत्न करणें हा सृष्ट वस्तूचा धर्म आहे. पाण्याला बांध घातला कीं, तें त्यांतुन निसटण्याकरितां बारा वाटांनीं प्रयत्न करीत असतें. हींच गति मनुष्यप्राण्याची आहे. ' माझें चरित्र कोणीं पाहूं नये ' अशी अनीगा विनायकानें घातली म्हणूनच त्याचें चरित्र जाणण्याची प्रत्येक महाराष्ट्रकाव्यभक्ताला तीव्र जिज्ञासा लागलेली आहे. ही महाराष्ट्राची बहुतकाळची जिज्ञासा, प्रस्तुत लेखक यथाशक्ति व यथामति पूर्ण करण्याचा प्रयत्न करीत आहे.

विनायकाचा जन्म इ. स. १८७२ त सप्टेंबरच्या १५ तारखेस रविवारीं, धुळें मुक्कामीं झाला. वडिलांचें नांव जनार्दनपंत ऊर्फ जनूभाऊ करंदीकर व

---

उपरिलिखित वाक्य खुद्द विनायक कवींचें आहे. कै० दत्तात्रय कोंडो घाटे, बी. ए., या नामांकित कवीनें नवनीताचें धर्तीवर अर्वाचीन कवितांचें नवनीत तयार करण्याचे हेतुनें आधुनिक कविता व कवींचीं चरित्रें जमविण्याचा प्रयत्न केला होता. त्या वेळीं त्यांनीं रीतीप्रमाणें कवि विनायकाकडेहि सचरित्र कवितांची मागणी केली असतां त्यांस विनायकाकडून वरील मथळ्याचें उत्तर मिळालें. पुढें कालांतरानें तो काव्यसंग्रह, सुप्रसिद्ध महाराष्ट्रकवि चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे यांचे प्रयत्नानें ' अर्वाचीन कविता ' या नांवाखालीं रा. रा. दामोदर सावळाराम यंदे यांचे मार्फत निघाला; पण त्यांत विनायकाचें काव्य आलें नाहीं व चरित्र तर नाहींच नाहीं ! बिचारा संकल्पक, संग्राहक व संपादक घाटे यांस तर तो भाग मुद्रित झालेला पाहण्याचेंहि भाग्य लाधलें नाहीं !

मातुःश्रींचें नांव लक्ष्मीबाई. मूळगांव कोंकणांत अलीबागेजवळ 'नागांव.' मातुःश्रींचें माहेरहि तेंच. विनायकाचे थोरले बंधु 'बळवंतराव ऊर्फ बाळाभाऊ' यांनीं आपल्या कांहीं कविता 'रमाकांत नागांवकर' या टोपण नांवानें प्रसिद्ध केल्या आहेत.

जुनीं संस्कृत काव्यें वाचलीं तर बहुधा असें आढळून येतें कीं, चरित्र-नायकांचे जन्मदिवस व काल हीं मोठीं शुभ वर्णिलेलीं असतात. श्रीमत् आद्य शंकराचार्य ज्या दिवशीं जन्मले त्या दिवसाचें वर्णन श्रीमत् विद्यारण्यांनीं श्रीमच्छांकरदिग्विजयांत फार सुंदर केलें आहे. उदाहरणार्थ पाहा:—

**'तस्मिन्दिने मृगकरीन्द्रतरक्षुसिंह-**
**सर्पाखुमुख्यबहुजन्तुगणा द्विषन्तः ।**
**वैरं विहाय सह चेरुरतीव हृष्टाः**
**कण्डूमपाकृषत साधुतया निघृष्टाः ॥ ७३ ॥**
**'वृक्षा लताः कुसुमराशिफलान्यमुञ्च-**
**न्नद्यः प्रसन्नसलिला निखिलास्तथैव ।**
**जाता मुहुर्जलधरोऽपि निजं विकारं**
**भूभृद्गणादपि जलं सहसोत्पपात ॥ ७४ ॥**
**'सर्वाभिराशाभिरलं प्रसेदे**
**वातैरभाव्यद्भुतदिव्यगन्धैः ।**
**प्रजज्वलेऽपि ज्वलनैस्तदानीं**
**प्रदक्षिणीभूतविचित्रकीलैः' ॥ ७६ ॥**

वरील वर्णनावर 'कविसंप्रदायाचा' शिक्का बसून त्याची विल्हेवाट कशी काय लागेल हें ठरलेलेंच आहे. प्रस्तुत चरित्रनायकाचें जन्मकालाचें जर असें रसभरित कोणीं वर्णन केलें [ या दिवसाचें वर्णन प्रसिद्ध महाराष्ट्र लेखक कै० हरि कृष्ण दामले यांनीं आपल्या "पार्वतीप्रकोप" या काव्यांत फार चांगलें केलें आहे. ] तर त्याला सांप्रदायाचें शेलापागोटें देणें जड जाणार आहे. कारण खानदेश ग्याझेटियर पुस्तक १२ यांत या दिवसाचें वर्णन सरकारी रीतीनें प्रासिद्ध झालें आहे. जिज्ञासूंनीं अवश्य पाहावें.

विनायक जन्माला आला त्या दिवशीं पांझरा नदीला पूर येऊन जनतेचें किती भयंकर नुकसान झालें याचें वर्णन त्यांत सविस्तर केलें आहे. या वेळीं जनुभाऊ करंदीकर पराडकरांच्या घराजवळ राहात असत. बाळंतिणीच्या बाजेपर्यंत पाणी येऊन पोंचल्यावर बाळबाळंतिणीस मोठ्या शिकस्तीनें बाहेर काढिलें. घरची अत्यंत गरिबी असल्यामुळें पुरापायीं झालेलें नुकसान भरून तर निघालें नाहींच पण हाल मात्र परमावधीचे झाले. त्या वेळचे धुळ्याचे हुजूर खजीनदार भिकू अण्णा दाते यांनीं या कुटुंबाची एक महिनाभर खाण्यापिण्याची सोय लाविली. त्यामुळें ते दिवस कसेबसे पार पडले. पुढेंहि हेच अण्णा या कुटुंबाचा समाचार बहुत दिवसपर्यंत घेत असत. या वेळीं जनुभाऊ हे कोर्टांत लिलांव, फिर्याद वगैरे पुकारण्याचें ( म्हणजे जवळ जवळ शिपायाचें-बेलिफाचेंहि नव्हे. ) काम करित असत.

जनार्दनपंतांना एकंदर आठ अपत्यें झालीं. पैकीं पांच मुलगे व तीन मुली. ज्येष्ठ चिरंजीव बळवंतराव. यांना ‘ बाळाभाऊ ’ असें म्हणत असत. ते पुष्कळ दिवस ‘ खानदेश वैभवा ’ चे संपादक होते. त्यांनीं कविता बरीच लिहिली असून ती ‘ बलवंत ’, ‘ रमाकांत नागांवकर ’ व ‘ गंधर्व ’ या तीन नांवांखालीं प्रसिद्ध आहे. बलवंताची कविता सरस, शुद्ध व मार्मिक आहे. ‘ प्रेमालेख्य ’ हें त्यांचें एकच सुंदर काव्य वरील म्हणण्याची सत्यता सिद्ध करावयास समर्थ आहे. अशा प्रेमळ व रसिक कवीकडूनच विनायकास कवितेचा ‘ श्रीगणे ’ मिळाला होता.

द्वितीय चिरंजीव विश्वनाथपंत हे रेव्हेन्यू खात्यांत कारकुनापासून वाढत वाढत हुजूर डेप्युटी कलेक्टरच्या जागेपर्यंत जाऊन पोंचले होते. या कुटुंबाचा सर्वतोपरी भार यांनींच वाहिला. यांना अपत्यें दोन. एक मुलगा व एक मुलगी. मुलाचें नांव ‘ नारायण ’ व मुलीचें ‘ मुक्ताबाई. ’ नारायणराव बी. ए. झाल्यावर बरेच दिवस पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूलमध्यें शिक्षकाचें काम करीत असत. एलएल्. बी. ची परीक्षा पास झाल्यावर त्यांनीं आतां आपल्या मूळ गांवीं म्हणजे ‘ धुळें ’ येथें वकिलीला सुरवात केली आहे. विद्याव्यासंग बराच झाला असल्यामुळें म्हणा किंवा घरांतच कवितेचें बाळकडू मिळालें असल्यामुळें म्हणा, नारायणरावांनाहि थोडाफार कवितेचा नाद आहे. विनायकाची अपुरी कविता ‘ हिरकणी ’ ही यांनीं

पूर्ण केली असून तिची हस्तलिखित प्रत उपलब्ध झाली आहे व ती पुढें परिशिष्टांत दिली आहे. या कवितेखालीं ' ना. वि. क. ' असें नांव दिलेलें आहे. ' नाविक ' म्हणजे ' नारायण विश्वनाथ करंदीकर. '

तृतीय पुत्र ' विनायक ' हे प्रस्तुत चरित्रनायक होत.

चवथे पुत्र दत्तात्रेय ऊर्फ दत्तोपंत हे पोलीसखात्यांत नोकर होते व पांचवें गोपाळराव. यांनीं एल्एल्. बी. ची परिक्षा झाल्यावर धुळें येथेंच वकिलीची सनद काढिली होती. परंतु खेदाची गोष्ट ही कीं, हातीं सनद येण्यापूर्वीच त्यांनीं आपला इहलोकचा कारभार आटोपला. गोपाळरावांचे मनांतून आपल्या उभय बंधूंच्या कविता एकत्र करून त्या पुस्तकरूपानें छापविण्याचें होतें, परंतु ईश्वरी इच्छा तशी नव्हती ! विनायकाची सेवा प्रस्तुत लेखकाकडून व्हावी असाच ईश्वरी संकेत होता म्हणावयाचें !

जनूभाऊंच्या तीन मुलींपैकीं पहिली धुळें येथील चिंत्तोपंत लेले यांना दिलेली होती. दुसरी बडोदें येथील ' फडके ' यांचेकडे दिलेली असून तिसरी बीड येथें डोंगरे यांचेकडे दिली आहे. या तीन मुलींपैकीं शेवटच्या दोन आज हयात आहेत. असो. उपरिनिर्दिष्ट पांचहि भाऊ लहानपणापासूनच हुशार, बुद्धिमान् व तेजस्वी असत.

विनायकाचें सर्व शिक्षण धुळें येथेंच झालें. त्या वेळीं धुळें येथील गरुड हायस्कुलांत रा. ब. गणेश जनार्दन आगाशे हे मुख्याध्यापक असून महादेव शिवराम आपटे हे उपशिक्षक होते. या दोघांहि शिक्षकांची विनायकावर फार मर्जी असे. शाळेंत असतांनाच त्यानें Green's Fairy Tales या पुस्तकांतील सरासरी १०० गोष्टींचें कविताबद्ध भाषांतर केलें होतें. त्याचप्रमाणें त्यानें Grey कवीच्या Elegy नामक प्रख्यात काव्याचेंहि मराठींत भाषांतर केलें होतें. परंतु खेदाची गोष्ट ही कीं, यांपैकीं उपलब्ध असें कांहींच नाहीं. Principles of morality ( नीतिशास्त्राचीं मूलतत्त्वें ) या सुंदर ग्रंथाचें भाषांतर विनायकानें गद्यांत केलें असून तें ' नीतितत्त्वें ' या नांवानें प्रसिद्ध आहे. हें शाळेंत शिकत असतांनाच लिहिलेलें पुस्तक त्यानें मुंबईच्या ' निर्णयसागर ' छापखान्याला अवघ्या ५० रुपयांस सर्व हक्कांसह विकून दिलेलें आहे. विनायक काव्यरचना इतकी जलद करी

कीं त्याला ' शीघ्रकवि ' म्हणावयास कोणतीच हरकत नाहीं. वर्गांत शिक्षकांनीं लिहावयास सांगितलेले निबंधहि तो कवितेंतच लिही. School Final चे वर्गांत असतां मित्रांबरोबर भेंड्या लावतांना तो शीघ्र कवित्व करून आपल्या मित्रांना सारखी हार खावयास लावीत असे! भाषाविषय त्याचा अत्यंत आवडता असून तो, तो अत्यंत मार्मिकतेनें शिकवीत असे. त्या वेळीं धुळें हायस्कुलांत वांगीकर या उपनांवाचे एक शिक्षक होते. हे मराठी शिकवीत असत. त्यांची विनायकावर इतकी बहाल मर्जी असे कीं, ते आपलें अध्यापनाचें काम समयपरत्वें त्याचेकडून करवून घेत असत. मायभाषेवर त्याचें इतकें अलोट प्रेम होतें कीं, त्यानें आपल्या अभ्यासाचे खोलींत, ही

आर्या ( गीति )

**वाटे ज्या बाळगणें प्राकृतभाषाभिमान हें पाप,**
**होवो न उंबरा हा चढण्याचा त्याजला कधीं ताप.**

लिहून ठेविली होती. ही कविता दिसण्यांत जरी विशेषशी मोहक नाहीं तरी पण तींत उत्कटता विशेष असून ती त्यानें विद्यार्थीदशेंत असतांना लिहिली आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. वरील आर्येप्रमाणेंच एक

श्लोक—

**आजचा दिन वृथा नच जाउं द्या,**
**फार घात असे समजा ' उद्यां '**
**जो उद्यांवर बसतोचि पहा नर,**
**गात राहिल कसा चिर तो तर.**

हि लिहून लाविला होता. या श्लोकांतहि कांहीं विशेष स्वारस्य आहे असें नाहीं. वाणी व कृति यांचा मेळच घालावयाचा म्हटलें तर विनायक लहानपणीं म्हणजे विद्यार्थीदशेंत असतांना—व बहुतेक मुलें लहानपणीं तशींच असतात; पुढें जों जों तीं मोठीं होत जातात तों तों त्यांना पंख फुटूं लागतात ही गोष्ट वेगळी—तो बराच नियमितपणानें व टापटिपीनें वागत असे, असें म्हटलें पाहिजे. असो. गणित हा विषय त्याचा अत्यंत नावडता होता व म्हणून तो नेहमीं म्हणत असे कीं,

मला एका गणिताखेरीज अगणित विषय आवडतात. जेमतेम अभ्यासाचा गाडा त्यानें अशा प्रकारें स्कूल फायनलपर्यंत ढकलत नेऊन तो इ. स. १८९१।९२ सालीं परीक्षेस बसला. सुप्रसिद्ध कवि कै० केशवसुत हे या वेळीं मुंबईस नोकरी करून असत. विनायकास भेटण्याकरितां म्हणून केशवसुत गोरेगांवकर बिल्डिंग्जमध्यें गेले असतां दोघेहि बोलण्याच्या भरांत इतके गुंगले कीं, विनायकाला परीक्षेस जावयाचें भान राहिलें नाहीं, व केशवसुतांना नोकरीवर जाण्याची आठवण झाली नाहीं. अर्थात् एक पेपर अशाप्रकारें अंतरल्यामुळें विनायकास परीक्षेंत नापास व्हावें लागलें. यापुढें तो पुन्हां परीक्षेस बसला नाहीं. खऱ्या जातिवंत कवीचें वर्तन दिक्कालातीत कसें असतें याचें हें एक उत्तम उदाहरण आहे.

इ. स. १८९३ सालीं डिसेंबर महिन्यांत विनायकाचें लग्न झालें. या वेळीं त्याचें वय सरासरीं २१ वर्षांचें होतें. लग्नाचे वेळीं आई व बाप हीं दोघेंहि होतीं. विनायकाचे सासरे 'रंगो वामन पटवर्धन' हे एरंडोलास सर्कल इन्स्पेक्टरचे कामावर असतांना विश्वनाथपंत करंदीकर हे भडगांवास महालकरी होते. मशारनिल्हे पटवर्धन व विश्वनाथपंत यांचा लहानपणापासूनचा स्नेहसंबंध असल्यामुळें हा शरीरसंबंध सहजासहजीं घडून आला. लग्नाची सर्व तजवीज विश्वनाथपंतांनींच केली. असो.

अशा प्रकारें विनायकाचे दोन हाताचे चार हात होऊन तो संसारपाशांत अडकला खरा, परंतु त्याचें गृह्यवर्तन अत्यंत बेफिकीरीचें असें. सरस्वतीबाईंचे अंगीं नवऱ्यास आपलेसें करून घेण्याची करामत नव्हती म्हणून म्हणा किंवा विनायकास आपलें मन रंगविण्याइतकें काव्य आपल्या पत्नींत आढळलें नाहीं, म्हणून म्हणा, एवढी गोष्ट खरी कीं, खरें संसारसुख उभयतांनाहि लाभलें नाहीं. सदर गोष्टीची कार्यकारणपरंपरा कोणी कशीहि लावो, प्रस्तुत लेखकाची अशी समजूत आहे कीं, काव्यरसापुढें विनायकाला इतर सर्व रस अगदीं तुच्छ वाटत असत व म्हणूनच तो काव्याखेरीज बाकीच्या ऐहिक सुखांविषयीं निरासक्त असे. इ. स. १९०६ सालीं त्यांनीं धरणगांव मुक्कामाहून खामगांव येथील शंकर पांडुरंग जोशी नांवाच्या एका गृहस्थाला एक खाजगी लिहिलेलें पत्र



कवि विनायक

उपलब्ध झालें आहे. या पत्रावरून वरील म्हणण्यास चांगलाच दुजोरा मिळतो. तें पत्र असें:--

श्री

धरणगांव
४-१-१९०६

राजश्री शंकर पांडुरंग जोशी,

आशीर्वाद् विशेष, आपण मला भेटलांत आणि कवितेविषयीं आस्था प्रगट केली. फार आनंदाची गोष्ट आहे. मात्र येवढी गोष्ट लक्षांत असूं द्या कीं, कविता म्हणजे फकीरी आहे. तिच्या नादीं लागल्यावर तुम्हांस ऐहिक वैभवावर पाणीच सोडावें लागेल, किंवा त्याचा तुम्हांला आपोआपच वीट येईल.

चांगल्या कवितेचें वाचन असूं द्या, रसिकांचा सहवास घडवून आणा, आणि एखाद्या सद्गुरूचा कृपाप्रसाद् संपादन करा. तुम्ही राहतां त्या रहाळांत शेवडे नांवाचे सद्गृहस्थ आहेत. ते तुम्हांस सुमार्ग दाखवितील. त्यांची माझी प्रत्यक्ष भेट नाहीं. तथापि माझ्या कनिष्ठ बंधूंच्या सांगण्यावरून त्यांच्या पात्रतेबद्दल माझा पूर्ण भरंवसा आहे.

( सही ) **विनायक.**

उपरिलिखित पत्रावरून विनायकाच्या एकंदर चरित्रपटावर चांगलाच प्रकाश पडण्याजोगा आहे. डोळस वाचकांना वरील पत्राचे उजेडांत विनायकाचें चरित्र बऱ्याच चांगल्या तऱ्हेनें वाचतां येईल असा समज आहे.

'वेडा कोण ?' या नांवाची एक कविता विनायकाच्या ज्येष्ठ बंधूंनीं म्हणजे बळवंतांनीं लिहिली आहे, तींत विनायकाचें चरित्रच त्यांनीं यथातथ्य रेखाटलें आहे; तशीच 'ही कोण माझी दशा' नांवाची दुसरी एक कविता बळवंतांनींच लिहिलेली आहे ती देखील विनायकाचे बाबतींत तंतोतंत जुळते. 'दोन पंथ' या नांवाची विनायकाची कविता आहे. ती 'वेडा कोण ?' या कवितेस उत्तरादाखल म्हणून असावी असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे. जिज्ञासूंनीं या तिन्ही कविता अवश्य वाचून पाहाव्या. 'वेडा कोण' ही कविता अभिनव

काव्यमालेच्या तिसऱ्या सरांत छापिली असून ‘दोन मार्ग’ ही प्रस्तुत पुस्तकाच्या १३४ पृष्ठावर आहे.*

विनायकाची प्रसिद्धीस आलेली अगदीं पहिली कविता म्हटली म्हणजे ‘एक पोलीस अम्मलदार’ ही होय. या कवितेंत एक गृहस्थ लांगूलचालनानें व क्रूरतेनें एक एक पदवी कसा पटकावीत गेला व शेवटीं त्याचे नांवामागें ‘साहेब’ ही पदवी लागून तो लोकांत कसा मानमरातब पावला याचें मोठें मजेदार वर्णन केलेलें आहे. सदर कविता धुळें येथें ‘नारायणराव पेशवे’ म्हणून एक पोलीस इन्स्पेक्टर होते, त्यांचेवर लिहिलेली आहे. सदर कवितेच्या कांहीं ओळी उपलब्ध झाल्या आहेत, त्या अशाः—

**पद** ( **चाल :** उद्धवा शांतवन करि जा. )

**म्हणतां मज नाऱ्या नाऱ्या । नारायण पडलें नांव,**
**नारायण कालगतीनें । झाला नारायणराव;**
**श्रीमंत मीच म्हणतात,**
**सरकार मला म्हणतात,**
**बहु जन मज गणती तात,**

ही कविता लिहिली त्या वेळीं इतकी लोकप्रिय झाली होती कीं, धुळें शहरांतील आबालवृद्धांस बहुतेक ती पाठ झाली होती. सबंध कविता हातीं येण्याकरितां पुष्कळ खटपट केली, पण ती व्यर्थ झाली.

“मनुष्य इच्छी एक व देव करी अनेक” या म्हणीचा अनुभव संसारांत मनुष्याला पदोपदीं येतो, तरी पण सर्वतोपरी पंगू अशा मनुष्याला अहंमन्यतेचें भरभक्कम गांठोडें उराशीं घट्ट धरून बसण्याची हाव सोडवत नाहीं. वरील पद्यावरून विनायकाचे मनांत पोलीसखात्याबद्दल किती आदर होता याची थोडीफार कल्पना सहज करतां येते. परंतु परिस्थिति अशी उत्पन्न झाली कीं, बिचाऱ्याला प्रथम पोलीसमध्येंच नोकरी करावी लागली. पण हा जुलमाचा रामराम फार दिवस

* ‘वेडा कोण?’ ही कविता डिसेंबर १९०२ च्या मनोरंजनांत आहे. अभिनवकाव्यमालेंत नाहीं.

टिकला नाहीं. पोलीसखात्यांतील नोकरांस लागणारी मनोरचना विनायकाजवळ नसल्याकारणानें त्याला ती नोकरी सोडून द्यावी लागली. सर्व आयुष्याची व संसाराची राखरांगोळी करणारी व्यसनें 'वेश्या व वारुणी'* हीं त्याला पोलीस-खात्यांत नोकरी करीत असतांनाच लागलीं असें कित्येकांचें म्हणणें आहे. कोणी म्हणतात एका असिस्टंट कलेक्टरला मराठी शिकविण्याला हा राहिला असतां त्याच्या शिरस्तेदारानें हा मंत्रोपदेश त्याला दिला व कोणाच्या मतें त्याला हें बाळकडू घरांतच मिळालें.† कांहीं का असेना तो या दोन्ही व्यसनांच्या तावडींत सांपडला होता ही गोष्ट निर्विवाद आहे व ती लपवून ठेवण्यांत तादृश फायदाहि नाहीं. पोलीसमधली नोकरी सोडल्यावर त्याला फरारी होऊन, कांहीं दिवस, धार व देवास या संस्थानांत अज्ञातवासांत काढावे लागले असें म्हणतात. या काळांत त्यानें आपला उदरनिर्वाह आपल्या कवितांवर केला असें ऐकिवांत

---

* या आपल्या जडलेल्या व्यसनांची विनायकास चांगली जाणीव होती असें त्याच्या खालील कवितेवरून दिसतें. या श्लोकांत त्यानें आपल्या पत्नीचें समाधान करण्याचा प्रयत्न केला आहे:—

श्लोक [ वृत्त : शा. वि. ]

**मी हट्टी, मजहूनही अधिक तूं आहेस हट्टी खरी,**
**केला हट्ट तुवांच, दोष मजला कां लाविसी तूं तरी ?**
**राहोनी पतिसंगमीं सुख जसें, तें कां वियोगीं असे ?**
**नाहीं भ्रांति तुझी अजून फिटली, त्याला करूं मी कसें !**
**दुर्दैवें जडलें मला व्यसन जें, तें साहवेना तुला,**
**होतें दुःसह, तापदायक, तरी हा मार्ग का चांगला ?**
**जन्माचा निधनें तुटेल न असा—संबंध जो जोडला,**
**घ्यावा गोड करून-ह्यांतच भलें,-हें का कळेना तुला ?**

† अनंततनयांच्या या विधानाचें समर्थन बलवंतांच्या पुढील आर्येनें होतें:—

**दुस्तर मदिरा मोहें ज्ञान, महाज्ञान सर्व लटपटतें.**
**घडतें असें कसें हें, नवल नसे, अनुभवें मलां पटतें.**

आहे. त्याच्या आवाजांत मधु* व डोळ्यांत जादु असल्यामुळें तो कोणालाहि हवासा वाटे. धरणगांवची कांहीं बडी बडी शेट मंडळी तर त्यावर इतकी फिदा असे कीं तीं त्याचा कच्चा खर्च चालवी ! !

पुढें सावद्याचे प्रख्यात दानशूर सरदार आण्णासाहेब गंभीररावसाहेब देशमुख यांचे वडिलांपाशीं तो कांहीं दिवस राहिला. विनायकासारख्या स्वतंत्र वृत्तीच्या मनुष्याला सावदेकर देशमुखांच्या घरचें वातावरण मानवलें नाहीं म्हणून म्हणा किंवा विनायकासारख्या व्यसनाधीन मनुष्याचा सहवास सावदेकरांना सहवला नाहीं म्हणून म्हणा, पण विनायकाला आपलें चंबुगवाळें येथून लवकरच आवरावें लागले, एवढी गोष्ट खरी ! पुढें कांहीं दिवस तो रिकामाच होता, नंतर तो धरणगांवच्या मिशनेरी बायांस मराठी शिकवावयास पंडित म्हणून बरेच दिवस राहिला. इ. स. १९०७ सालीं त्यानें हीहि नोकरी सोडून दिली व नगर देवळें येथील जहागीरदारांकडे कारभाऱ्याची जागा पत्करली. ही त्याची शेवटची नोकरी. जेमतेम दोन वर्षें त्यानें ही नोकरी बजावली. इ. स. १९०९ सालीं नाट्यकला-प्रवर्तक संगीत नाटक मंडळीनें त्याची प्रभावती रंगभूमीवर आणण्याचें नक्की करून त्यास ती बसवून देण्याकरितां पुण्यास बोलाविलें. पुण्यास येऊन पांच सहा दिवस झाले नाहींत तोंच त्यास तापानें पछाडलें व त्यांतच त्याचा अंत झाला ! जन्माप्रमाणें त्याचा अंतहि मोठ्या करुणास्पद स्थितींत झाला. विनायक अत्यवस्थ झाल्याबरोबर त्याच्या येथील आप्तेष्टांनीं त्याच्या पत्नीस येथें तारेनें बोलावून घेतलें. विनायकाचें देहावसान होण्यापूर्वीं बरोबर एकच दिवस सरस्वतीबाई येथें

---

* अनंततनयांचें हें विधान खरें आहे. कारण विनायकांनीं आपले लहान बंधु दत्तात्रेय ज. करंदीकर, पोलीस जमादार एदलाबाद यांना 'दसऱ्याचें सोनें' ही पृष्ठ १२० वरील क्रमांक ३१ ची कविता पाठवितांना I regret, the meter though sweet, you cannot enjoy without me.

V. K.

असे उद्गार काढले आहेत. [ पाहा–रामदास आणि रामदासी भाग ५०, सर ५, मणी ६ ]

येऊन पोहोंचल्या. उभयतांची दृष्टादृष्ट होतांच विनायक एखाद्या अर्भकाप्रमाणें रडूं लागला ! हृदय फोडणाराच प्रसंग तो ! त्या प्रसंगाचें यथातथ्य वर्णन करण्याचें सामर्थ्य या लेखणींत नाहीं. त्याला चितान्याचीच लेखणी पाहिजे. लग्नापासून आजतागाईत जिला सुखाचा वारा लागूं दिला नाहीं, प्रेमाचा फुकाचा गोड शब्द ऐकूं दिला नाहीं, आर्त आवडीनें सुखाचा घास खाऊं दिला नाहीं, चिरगूट-पांघरूण लेऊं दिलें नाहीं, त्या साध्वीला या अशा वेळीं समोर उभे राहिलेले पाहतांच कोणींहि अधमाधम नरपशूचें अंतःकरण फुटलें पाहिजे; मग विनायका-सारख्या भावनाप्रधान कवीचें हृदय पश्चात्तापाच्या तीव्र वेदनांनीं जळूं लागलें यांत विशेष नवल तें कोणतें ? डोळ्यांवाटें घळघळ वाहणाऱ्या गंगायमुनांच्या अलोट ओघानें त्यानें आपल्या कृतकर्माचें प्रक्षालन केलें. पश्चात्तापानें दग्ध झालेल्या हृदयाला गंगायमुनांच्या शीतलजलांचा ओलावा मिळतांच त्याला किंचित् हलकें वाटलें व दुसरे दिवशीं म्हणजे शके १८३१ चैत्र शु० ९ स ( ३०–३–१९०९ ) त्यानें सुखानें आपल्या पत्नीचे अंकावर प्राण सोडिला ! ! !

मरतेसमयीं त्यानें आपल्या पत्नीचें समाधान खालील शब्दांनीं केलें:—

**पद** [ चाल : तात तुझा तनया. ]

**भोग कुणां सुटले जगीं या ॥ ध्रु० ॥**
**भोग भोगिले बरवें झालें, ऋण त्यांचें फिटलें !**
**श्रीरामानें वनवासाला काय नको म्हटलें ! १**
**हय खाजवितां कृष्णाचे कर काय कधीं विटले !**
**धैर्यें पांडव दिवस कंठिती व्यसनीं गुरफटले ! २**

ही त्याची अगदीं शेवटची कविता होय ! ही कविता वाचून साधुश्रेष्ठ श्रीतुकोबारायांनीं तुळशीचे ओट्यावर बसून जिजाऊला ( आपल्या पत्नीला ) " पिकल्या शेताचा आम्हां देतो वांटा । चौधरी गोमटा पांडुरंग " हे अकरा अभंग म्हणून जो बहुमोल उपदेश केला त्या प्रसंगाची आठवण कोणाला होणार नाहीं !

विनायकाचें टोपणनांव ' बाबूराव ' असें होतें व त्याची स्नेही मंडळी त्याला या नांवानें संबोधित. विनायकाचे स्नेही " अमूकच " होते असें नक्की सांगतां

येणार नाहीं. ज्यांच्यांत तो बराच काळ घालवी ह्यांना स्नेही म्हटलें तर ते सर्व चंगीभंगी, व्यसनाधीन व धनाढ्य असे लोक होते. शाळेंतील मित्र हे तर स्नेही होतेच, पण विशेषतः लक्षांत ठेवावयाची गोष्ट ही कीं, तो ज्यांच्याशीं बोलेल त्याला 'विनायक' आपला 'मित्र' आहे असें म्हणावयास बिलकूल शंका वाटत नसे. याचें कारण तो वाणीनें रसाळ व मनानें प्रेमळ व मोकळा असे. आनंद ही त्याची सहज वृत्ति होती. दुर्मुखलेला तो कधींच दिसला नाहीं. अशा प्रकारें विनायक जगन्मित्र होता. तरी त्याचे खरे जीवाभावाचे स्नेही म्हणजे दोनच. एक धुळ्याचे प्रसिद्ध वकील रा. रा. शंकर श्रीकृष्ण देव व दुसरे काव्यरत्नावलीकार रा. रा. नारायण नरसिंह फडणीस. कवि तर सगळेच त्याचे मित्र असत. पण खरें बोलावयाचें म्हणजे कवींपेक्षां रसिक वाचकच त्याला फार आवडत. तो नेहमीं म्हणे 'आम्ही कविता करण्यास समर्थ आहोंत, तुम्ही फक्त वाचावयास तयार व्हा.' रसिकाची किंमत तो अधिक मानीत असे व तें बरोबरच आहे. 'रसं जानाति पण्डितः'. स्वतःच्या कविता तो फारसा कधीं म्हणून दाखवीत नसे. पण कविता म्हणण्याची त्याची धाटणी इतकी विलक्षण असे कीं, ती म्हणत असतांनाच ऐकणाऱ्याच्या हृदयांत तिचा अर्थ व रस पूर्णपणें ओतून देत असे. केशवसुताची 'घुबड' ही कविता त्याला फार आवडे व ती तो मोठ्या प्रेमानें म्हणून दाखवीत असे. रा. रा. शंकर श्रीकृष्ण देव आपल्या तारीख १७–९–१९१९ चे पत्रांत लिहितात, "बाबूराव करंदीकर माझे स्नेही होते. माझ्याहून वर्ष दोन वर्षांनीं लहान व खालच्या वर्गांत होते. पण एकाच गल्लींत घरें असल्यामुळें व त्यांच्या वडिलांचा माझ्या वडिलांशीं स्नेहसंबंध असल्यामुळें व बाबूरावांचा स्वभाव विनोदी व मोकळा असल्यामुळें, अलीकडील कवींपैकीं मला फक्त त्यांचीच कविता आवडत असल्यामुळें व त्यांच्या कवितेंत देशाभिमान व धर्माभिमान असल्यामुळें, आमचा रिकामा काळ विशेषतः सायंकाळचा फिरावयास जाण्याचा काळ परस्परांचे संगतींत जाई. बाबूराव गोष्टी सांगावयास लागले किंवा स्वतःच्या कविता म्हणून दाखवूं लागले, किंवा इतर कवींच्या कवितांतील गुणदोषविवेचन करूं लागले, किंवा आत्मचरित्र सांगूं लागले किंवा पोलिसच्या लीला सांगूं लागले म्हणजे सर्वांत विनोद इतका असे कीं, तासचे तास त्यांत जात. बाबूरावांची एखादी देशभक्तीची

सुंदर कविता पाहून मी त्यांना म्हणे ' कवींचें **मन** आणि तो करतो ती **कविता** यांचा कांहींच संबंध नसतो काय ? ' He would say " तुम्ही काय समजतां ? माझ्या मनांत ही देशभक्ति नाहीं ? नसेल तर कवितेंत उतरणारच नाहीं ! " त्याचप्रमाणें इंदूरचे रा. रा. नरहर शंकर रहाळकर आपल्या तारीख ४-९-१९१९ इसवींचे पत्रीं विनायकाबद्दल लिहितात, " विनायक हा चंगीभंगी असे. मनाचा अत्यंत प्रेमळ व सच्चा. गुणांचा चहाता, पण पूर्ण लहरी. जगांतील बहुतेक सर्व व्यसनांची त्यांनीं चाखणी केली होती. त्याचें ध्येय अत्यंत उच्च असे, पण स्वतःचें वर्तन मात्र त्याच्या विरुद्ध. राष्ट्रोन्नति हें त्याचें ब्रीद. जगास बोधामृत पाजण्याची तयारी, पण स्वतःच्या मात्र त्या अमृताचा घोटहि उपयोगीं पडत नसे. त्याच्यासारखा आनंदी जीव क्वचितच आढळेल. कोणत्याहि परिस्थितींत त्याची रंगेल वृत्ति दिसावयाचीच. समाजाच्या सर्व दर्जांतून तो गेला होता. त्याला आपल्या कवितेचा फार अभिमान असे. तसेंच दुसऱ्यांच्या कृतींबद्दलहि त्यास आदर वाटे. शृंगार, वीर व राष्ट्रजागृति हे त्याचे आवडीचे विषय. उत्तानवृत्ति व स्वैरवर्तन यांतच त्यास अपरंपार सुख लाभे. "

विनायक विनोदी असे हें वर सांगितलेंच आहे. कोटि करण्यांतहि तो पटाईत असे. जळगांवीं इ० सन १९०७ मध्यें भरलेल्या कविसंमेलनांत कविवर्य रा. रा. चंद्रशेखर यांची त्यानें त्याच्या ' तारातरंग ' नामक कवितेवरून खाजगी बैठकींत यतिभंगाबद्दल बरीच टर उडविली होती. तो समाजांत लाजाळू असे पण खाजगी बैठकींत फार स्पष्ट व खाष्ट असे. तारातरंगांतील पहिला श्लोक तो मुद्दाम खालीलप्रमाणें घोळघोळून म्हणेः—

**माझिया लोचनां । नों पहा । हो पहा ।**
**श्रीनिशा । देविचा । राष्ट्रविस् । तार हा ।**

असल्या कविता लिहिण्यापेक्षां ' लावण्या, छक्कडी, पदें ' लिहिणें फार श्रेयस्कर असें तो म्हणत असे !

इंद्राला ' सहस्त्राक्ष ' कां म्हणतात याविषयीं त्यानें एकदां अशी **विनोदपर कोटि** केली होती कीं, त्याला उपदंश झाला होता, त्यामुळें त्याचे सर्व अंगभर जे व्रण पडले त्यांना डोळे म्हणत ! श्रीमंतांनीं पितळ घातलें तरी सोनेंच ! कै. राम

गणेश गडकरी हे उत्तम विनोदी होते असा त्यांचा लौकिक आहे. त्यांनीं एकदां असाच **सीतेबद्दल** विनोद केला होता. बोलण्याच्या भरांत मागचा पुढचा पाच-पोंच न ठेवितां 'सीता' ही जनकाला केराच्या पेटींत सांपडलेली बिनवारशी पोरगी होती, असें ते बोलून गेले! अशाच प्रकारचा विनोद करण्यांत रा. रा. ग. स. मराठे ॲक्चुअरी यांचा हातखंडा आहे. 'विलायतविहार' या मथळ्याखालीं त्यांचीं केसरींत फार दिवसांपूर्वी कांहीं पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. त्या पत्रांत वरील-खारखा विनोद अगदीं ओतप्रोत भरला आहे.

अशा विनोदाला--पितृकच्छमोचनविनोदाला—निदान प्रस्तुत लेखक तरी 'विनोद' म्हणून संबोधावयास तयार नाहीं! महाराष्ट्र जन्मतः विनोदी नाहीं. गांभीर्य हें महाराष्ट्राचें वैशिष्ट्य आहे. महाराष्ट्राला—हाडाच्या खऱ्या महाराष्ट्राला—हा विनोद पचणें शक्य नाहीं. विनोदाच्या वरील उदाहरणांवरून 'मनुष्य आपल्यावरून जग कसें ओळखतो' हें मात्र चांगलें प्रत्ययास येतें खरें!

'जें पोटीं तेंच ओठीं' असें विनायकाचें वर्तन असे. 'खायचे दांत वेगळे व दाखवायचे निराळे' असें त्यांजजवळ नसे. रा. रा. गोविंद पांडुरंग देवधर* यांस त्यांनीं इ. स. १९०५ मध्यें लिहिलेलें पत्र उपलब्ध झालें आहे. तें असें:—

धरणगांव—खानदेश श्री ५।९।१९०५

"विनायका" चा साष्टांग नमस्कार वि. वि.

आपलें माझ्या कवितेचें मार्मिक परीक्षण वाचून आनंद झाला. आपल्यासारखे मार्मिक काव्यपरीक्षक फार थोडे आहेत. आपण दाखविलेले दोष सुधारण्याचा मी अवश्य प्रयत्न करीन. माझी सुमारें आठ वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेली कविता देखील आपल्या स्मरणांतुन गेलेली नाहीं, यावरून मी 'तीर आणि गाणें' नांवाची कविता मागें करमणुकींत प्रसिद्ध केलेली होती, तिची सार्थकता झाल्यासारखें वाटतें. असें निर्भीड परीक्षण माझे मित्र कवि केशवसुत, माधवानुज, चंद्रशेखर व

---

* कै. देवधर हे मध्यप्रदेशांत बैतूल येथें वकील होते. त्यांची कांहीं कविता अभिनव काव्यमालेच्या दुसऱ्या भागांत आहे.

दसरा-

फिरतें कालचक्र भूवरी
दसरा ये प्रति संवत्सरी
पूर्वजस्मरण आम्हांस देतसे परी
सोडवे न ध्यास यास राहिलें दुरी   ७

आलों आम्ही घरकोंबडे
विणिलें शब्दजाल कोरडें
शब्दांचें वादळ कृतीविण फिकें पडे
आंग्लेयांस वंदिन आम्हां निराशा नडे.

विनायक.

कवि विनायकांचें हस्ताक्षर

टिळक यांच्या कवितेचें झाल्यास त्यांसहि त्यांच्या कवितेचे गुणदोष कळून येतील. गुणांबरोबर दोष हे असावयाचेच, पण ते ज्याचे त्यास दिसून येत नाहींत. शिवाय मनुष्याची आत्मयोग्यतेची जाणीव बहुधा चुकलेली असते, म्हणून असले परीक्षण-लेख अगदीं अवश्य होत.

२. काव्यरत्नावलीचें पात्र फार कोतें आहे, हें आपण जाणतच आहां. असे सविस्तर लेख साग्र प्रसिद्ध करण्याची तिची ऐपत नाहीं, तेव्हां असे लेख इंदुप्रकाश किंवा ज्ञानप्रकाश अशा पत्रीं प्रसिद्ध झाल्यानें रत्नावलीकडे लोकांचें लक्ष वेधविल्याचें श्रेय आपणांस येईल.

३. कांहीं विशिष्ट हेतूनें मीं कांहीं उपाख्यानें लिहिलीं आहेत व तीं अशा क्रमानें प्रसिद्ध होत आहेत.

१ जुलै—ध्यास तो भास
२ आगष्ट—गणिकोद्धार
३ सप्टेंबर—वीरमती
४. आक्टोबर—मोहानंतर
५. नवंबर—सत्त्वरक्षण
६. दिसेंबर—पातकांचा झाडा

पहिल्या दोहोंची छाननी आपण केलेलीच आहे. आतां वीरमती आपल्यास मिळाली असेलच. त्याच अंकाच्या मलपृष्ठावर ‘ माधवानुजांचा ’ अभिप्राय दिसून येईल. ‘ वीरमती ’ आपल्यास कशी काय आवडली तें कृपेनें मला परभारें कळवाल काय ?

४. हल्लींच्या लोकस्थितीस कांहीं विशेष बोध काव्यद्वारां व्हावयास पाहिजे आहे असें मी समजतों. तिकडे माझ्या बहुतेक कविबंधूंचें अलक्ष दिसतें. ती उणीव दूर व्हावी म्हणून या उपाख्यानांचा जन्म आहे. कांहीं वैराग्यपर व कांहीं वीरश्रीपर आहेत. शृंगार हा दोहोंतहि अंगभूत आहेच. तरी अशा आख्यानाला उपयोगी होतील, अशा कांहीं कथा आपणांस माहीत असल्यास मला कृपेनें कळवा.

५. आपण मला बहुत दिवसापासून जाणत आहां. मी मात्र आपणांस आतांच ओळखूं लागलों. तेव्हां ही ओळख स्नेहरूप पावो अशी इच्छा प्रदर्शित करून आपली रजा घेतों.

आपला नम्र कवि–मित्र
( Sd– ) Vinayak Janardan
Karandikar.
Dharangaon—Khandesh.

आपल्या समकालीन कविबंधूबद्दल विनायकाचे अंतःकरणांत आदर होता कीं अनादर होता, व प्रेम होतें कीं वैर होतें याचें दिग्दर्शन वरील पत्रांत सुंदर झालें आहे. रा. रा. नरहर शंकर रहाळकर यांनीं कांहीं वर्षांपूर्वी मासिक मनोरंजनांत केशवसुतांच्या चरित्रासंबंधीं एक सुंदर लेखमाला लिहिली आहे. सदर लेखमालेपैकीं एका लेखांत त्यांनीं केशवसुतांचे गुणगौरव गातां गातां बिचाऱ्या विनायकावर उगीच दोनचार शिंतोडे उडविले आहेत. ‘ काशीस जातां काशीदास व गयेस जातां गयादास, ’ या दृष्टीनें पाहिलें तर त्यांनीं लिहिलें तें ठीकच आहे असें म्हणणें प्राप्त आहे. परंतु अशा लिहिण्यानें एकाची स्तुति करितां करितां दुसऱ्याच्या अकारण निंदेचें पाप आपण आपल्या डोक्यावर घेतलें हें त्यांचे लक्षांत आलें नाहीं असें दिसतें. विनायकाचें वर्तन एककली होतें व त्याची वृत्तिं बेफिकीर असे, असें मागें सांगितलेंच आहे. समाजांत तो अगदीं बावरल्यासारखा होत असे. कवींना योग्य अशा एकान्तांत त्याला फार बरें वाटे. विनायकांनीं केशवसुतांना टाळण्याचा प्रयत्न केला एवढेंच आपल्यासमोर आहे; पण तसें त्यानें कां केलें किंवा त्या वेळची परिस्थिति काय होती त्याचा मात्र उल्लेख नाहीं ! विनायकानें भडगांवीं जाऊन केशवसुतांची क्षमा मागितली असें रा. रहाळकर लिहितात, पण ती त्यांनीं स्वतःच्या वर्तनाबद्दल पश्चात्ताप होऊन मागितली किंवा त्या वेळेस केशवसुत रागावल्यासारखे दिसले म्हणून मागितली हें कांहींच सांगितलें नाहीं. विनायक रंगेल मित्रांसह येत होता असें म्हटलें आहे. कदाचित् खरेंहि असेल. त्याला रंगेल मित्र नव्हते किंवा तो व्यसनाधीन नव्हता हें केव्हांहि नाकबूल करणें शक्य नाहीं ! परंतु त्या वेळीं बरोबर असणारे गृहस्थ रंगेल

मित्रच होते किंवा नाहीं आणि त्यांच्यामुळेंच त्यांनीं केशवसुतांना टाळण्याचा प्रयत्न केला कीं काय वगैरे निश्चितपणें कांहींच सांगणें शक्य नाहीं! विनायक हा धुळ्यास व इतरत्र उत्तम इंग्रजी अर्ज लिहिणारा म्हणून प्रसिद्ध असे. संभावित वकिलांबरोबर असणाऱ्या गांवढळ लोकांप्रमाणेंच कदाचित् कांहीं रंगेल लोक अर्जानिमित्त किंवा दुसऱ्या कामाकरितां त्याच्याबरोबर असणें संभवनीय आहे. रा. रहाळकर यांनीं ज्या अर्थानें 'रंगेल' हा शब्द वापरला आहे त्या अर्थानें विनायक स्वभावतः रंगेल नव्हता. स्वभाव फकीरी व बेफिकीर! परंतु प्रसंगानें मात्र तो रंगेल होई. असो.

उपरिनिर्दिष्ट पत्राचे चवथे पॅरिग्राफांत विनायकानें आपल्या एका भावी आक्षेपकाचे शंकेस उत्तर अगाऊ देऊन ठेविलें आहे. मित्र रा. रा. गजानन त्र्यंबक माडखोलकर हे आपल्या मोहक लेखनचातुर्यानें महाराष्ट्रास आतां परिचित झाले आहेत. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या संस्कृत कविपंचकाचे धर्तीवर त्यांनीं आधुनिक पण गत महाराष्ट्र कवींच्या काव्यांचें* सुंदर विवेचन आरंभिलें आहे. नवयुगाचे मे व जून १९२० च्या जोड-अंकांत त्यांनीं विनायकाच्या कवितेचें मोठें मार्मिक व सुंदर विवेचन केलें आहे. त्यांत ते एका जागीं म्हणतात:—'विनायकाचीं हीं सर्वच गाणीं गोड आहेत असें नाहीं. 'पद्मिनी,' 'दुर्गावती' व 'संयोगिता' हीं गाणीं बरीं साधलीं आहेत. विनायकाच्या इतर कवनांच्या मानानें गाणीं साधारणच आहेत; या गाण्यांतील 'कृष्णाकुमारी' हें गाणें उत्तम आहे. परंतु या रमणीरत्नमालेंतून रावसाहेब पेशव्यांच्या पतिनिष्ठ पत्नी 'रमाबाई' व झांशीची पराक्रमी राणी दिगंतकीर्ति 'लक्ष्मीबाई' ही दोन महाराष्ट्रीय युवतिरत्नें कशी गळलीं देव जाणे! हा बहुधा 'पुरुषाचा धर्मभ्रम' असावा.

माडखोलकरांचा हा 'पुरुषाचा धर्मभ्रम' चुकला आहे. विनायकाचें इतिहासाचें वाचन फारच अल्प होतें असें दिसतें. विनायकानें आपल्या गाण्याकरितां जीं हीं

---

* हे सर्व लेख एकत्र संकलित करून श्री. माडखोलकरांनीं ते 'आधुनिक कविपंचक' या नांवानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केले आहेत.

रमणीरत्नें निवडलीं तीं त्याला मराठी जुन्या क्रमिक पुस्तकांच्या खाणींतच मिळालीं. पतिनिष्ठ रमाबाईसाहेब व दिगंतकीर्ति लक्ष्मीबाई यांचीं चरित्रें जरें त्याला त्या क्रमिक पुस्तकांत मिळालीं असतीं किंवा उपरिलिखित पत्राचे ४ थे पॅरिग्राफांत त्यानें रा. देवधर यांस लिहिल्याप्रमाणें त्याला जर कोणीं कवि–मित्रानें कांहीं आख्यानें लिहून पाठविलीं असतीं तर हा रमणीरत्नहार आहे याहून मोठा झाला असता खास.

इ. स. १८९७ हें साल महाराष्ट्राच्या आधुनिक इतिहासांत फार महत्त्वाचें आहे. प्लेगचा कहर, रँड व आयर्स्ट यांचे खून, लोकमान्यांचा बंदीवास व चाफेकर बंधूंची फाशी वगैरे गोष्टींनीं हें साल चिरस्मरणीय झालें आहे. या सालीं धुळ्यासहि प्लेग होता. मंडळी गांवाबाहेर राहात होती. श्रीगणेश उत्सवहि अर्थात् झोंपड्यांतूनच झाले. या सालीं विनायकानें विनायकाची पूजा पुढील पद्यानें केलीः—

**पद** [ चाल : चंद्रकांत राजाची... ]

**रोगें पीडित नगरें नसती योग्य वसायाला,**
**म्हणुनी..............पर्णशाला ॥ ध्रु० ॥**
**गणरायाची मूर्ति मंगला स्थापूं ये स्थानीं,**
**विघ्नहरातें प्रेमें न्हाणूं याच आसवांनीं;**
**अशा प्रसंगीं तिलक लाधणें महत्प्रयासाचें,**
**दिसो दिसेल सुनें त्यावेगळें भाल गणेशाचें;**
**पुष्प एक वाहून टाकिलें आहे चांफ्याचें,**
**दुसरें मिळवायाला जाऊं करूं उद्यमाला ! ?**

हें पद आतां संपूर्ण उपलब्ध झालें असून तें पुढें छापलें आहे. [ अनुक्रमांक २ ची कविता पाहावी. ]

इ. स. १९०८ सालीं प्रो. शिवराम महादेव परांजपे कैदेंत असतां ते वारल्याची अफवा उठली होती. त्या वेळीं विनायकाला इतका कांहीं चेव आला होता कीं, त्याचें वर्णन करणें कठिण आहे. या वेळीं त्यानें पुढील कविता लिहिलीः—

**पद** [ चाल : दो दिवसाची ]

**देवघरासम पूज्य मानिती देशभक्त बंधनस्थलें,**
**देशभक्त ज्या चढे सुळावर जयस्तंभ ते उभारले;**
**अंगारा लाविती चितेचा देशभक्त जीवरी जळे !**
**देशभक्तयश गाऊन कवी धन्य जाहले भले भले ! १**

याच सालीं त्याचें प्रभावती नाटक संपूर्ण होऊन तें श्रीकरुणेशप्रासादिक नाट्यकलाप्रवर्तक संगीत नाटक मंडळीनें बसवावयास घेतलें. हें नाटक लिहावयास त्यानें इ. स. १८९२ त आरंभ केला होता. रा. रा. श्री. कृ. कोल्हटकर यांचें संगीत वीरतनय बाहेर पडल्यावर या गर्भावस्थेंतील नाटकाला त्यानें ' वीरतनया ' हें नांव द्यावयाचें योजिलें होतें. हेतु हा कीं, कोल्हटकरांच्यावर एक मात्रा चढवून आपण त्यांच्यावर सरशी करावी; पण चिकाटीच्या अभावीं तें नाटक त्याच्या स्वतःच्याच मनाजोगें उतरलें नाहीं व तशांतून नाट्यकलाप्रवर्तक मंडळीकडूनहि त्याचा योग्य परामर्ष झाला नाहीं असें ऐकिवांत आहे. पण हें खरें वाटत नाहीं. हें नाटक मुळांतच इतकें कडक लिहिलेलें होतें कीं, तें मूळ स्वरूपांत रंगभूमीवर येणें अशक्य होतें. सध्यां रंगभूमीवर होत असलेलें प्रभावती नाटक मूळच्या षोडशांशहि शिल्लक उरलें नाहीं !

विनायकानें नाट्यशास्त्राचा चांगला अभ्यास केला होता. त्यानें नाटकांत कोठें काम केल्याचें ऐकिवांत नाहीं; पण तो उपजत नट होता. नानाप्रकारचे चेहरे बदलण्यांत त्याचा हातखंडा असे. मुलांना वेडीं-वांकडीं तोंडें करून गाणीं म्हणून दाखविण्यांत त्याला फार कौतुक वाटे. तसेंच युरोपियन लोक मराठी अगर संस्कृत श्लोक म्हणतांना अगर त्यांच्या पद्धतींचें गाणें, नाच, वगैरे करतांना जशीं तोंडें करितात त्याचप्रमाणें तो हुबेहूब करित असे. एकदां त्याची व त्याच्या वडील बंधूंची रस्त्यांत गांठ पडली. त्या वेळीं वडलि बंधूच्या दृष्टीस पडणें त्यास इष्ट नव्हतें. तेव्हां त्यानें चटकन् आपली लांब हनुवटी ( हा त्याच्या शरिरांतील विशेष होता. त्याचा फोटो पाहा. ) गळ्यांत खुपसून डोळे फिरवून, कोटाच्या बाहीचा भाग मोकळा सोडून थोट्या हाताच्या मनुष्याप्रमाणें केलें. हें सोंग त्याला इतकें उत्तम साधलें कीं, त्याच्या बंधूनें त्यास मुळींच ओळखलें नाहीं. ते निघून गेल्यावर पुन्हां पूर्ववत् चेहरा करण्यास त्यास पांच मिनिटें म्हणजे बराच काळ लागला !

प्रवेशांची निवड कशी करावी, त्यांची मांडणी कशी असावी, रंगभूमि बंद न पडूं देतां सारखी सुरू कशी ठेवावी, प्रेक्षकांचीं मनें व नेत्र हीं सारखीं कशीं लोभवून घ्यावींत, रसाचा अपकर्ष न होऊं देतां त्याचा सारखा उत्कर्ष कसा होऊं द्यावा, वगैरे गोष्टींत त्यानें चांगलें नैपुण्य संपादन केलें होतें.

धुळें हायस्कुलांत ग्यादरिंगचे वेळीं एकदां संगीत शाकुंतल नाटक मुलांनीं बसविलें होतें. त्या वेळीं विनायकानें त्या नाटकांत स्वतः एक पद करून घातलें होतें. चवथ्या अंकांत शकुंतला कण्वाश्रम सोडून जाते त्या वेळीं तिच्या सख्या सखीविरहामुळें खिन्न होऊन खालीं पाहात उभ्या असतात. त्या ठिकाणीं त्या सख्यांच्या तोंडीं कांहीं तरी पद * असणें अवश्य आहे असें त्यास वाटून त्यानें खालील पदाची योजना केली:—

**भैरवी.**

**सखिविण मजला दशदिशा। सर्वथा शून्यशा।**
**भासती, लोटती, आंसवें लोचनीं ॥ ध्रु० ॥**
**उदास आश्रम लोचनांपुढें नको नको मजला,**
**शकुंतलाप्रियस्थलावलोकन कारण अश्रुजला;**
**प्रिय ताता। मज आतां। करमेना। विरमेना।**
**टाकुनि गेली सखी। हाऽऽऽय हायऽऽऽहाय! १**

---

* किर्लोस्कर नाटक मंडळीनें, याच प्रसंगीं म्हणण्याकरितां एखादें चांगलें पद करून मागितल्यावरून विनायकानें त्यांस खालील—

**पद—**

**आहे सम दुःखद सकलां। सखये प्रियविरह. ध्रु०**
**तृण गिळवेना हरिणातें। दुःखें कंठभाग दाटे**
**लतिका अश्रूसम येथें। गाळिति टपटप् जीर्णदला! १**

करून दिलें. प्रस्तुत पदाचें आणखी एखादें कडवें असावें असें वाटतें. हें प्रियंवदेचें भाषण असून मूळ श्लोक असाः—

**उद्गलितदर्भकवला मृग्यः परित्यक्तवर्तना मयूराः।**
**अपसृतपाण्डुपुत्रा मुञ्चन्त्यश्रूणीव लताः ॥ १ ॥**

वर दिलेलें पद्यमय भाषांतर गोळाबेरीजच आहे, परंतु हृदयंगम आहे.

कै. देवल यांच्या संगीत शारदा नाटकांत असाच एक प्रसंग आहे. त्या प्रवेशांत बऱ्याच मुली संगमनाथाच्या दर्शनाला म्हणून येतात. देवास नमस्कार करितात व जातात. वस्तुतः येथें एक प्रार्थनापर पद घातलें असतें तर बरें झालें असतें असें विनायकास वाटून त्यानें त्या ठिकाणीं खालील पद्याची योजना केली.

**पद** [ चाल : चालुनि चालुनि अति...... ]

**त्रिभुवनपति गिरिजाधव सांबा।**
**मानिती, पूजिती, स्ताविती ज्या**
**नारदतुंबर नित्य स्तवितसे अंबा! ॥ ध्रु० ॥**
**त्रिपुरारी, शुलधारी, भक्ता तारी हृदयांतरिं ध्यावा! ॥ १ ॥**
**गातां तारी, ताप हरी, परोपरी,**
**नामा घेतां संसारसागर पार करी तारी मदनारी! ॥ २ ॥**

वरील दोन्हीं पद्यें अगदीं साधींच आहेत खरीं, पण त्यांवरून त्याची नाट्यां-तील मार्मिकता चांगली दिसून येते.

आलफ्रेड किनरीवाला झाला या प्रसंगावर इंग्रजींत एक नाटक आहे. त्याचें रूपांतर करावयास त्यानें आरंभ केला होता. हें रूपांतरित नाटक किती लिहून झालें होतें, पुरें झालें कीं नाहीं वगैरेबद्दल कांहींच माहिती मिळत नाहीं. इ. स. १९०७ मध्यें जळगांवीं भरलेल्या कविसंमेलनांत, खाजगी बैठकींत त्यानें त्या नाटकांतलें खालील पद स्वतः म्हणून दाखविलें होतें:—

**पद**

**धिग् धिग् धिग् जो देशाचें। गाई गीत अपयशाचें।**
**मी निजदेशयशोगानीं। वाहिली असे सदा वाणी।**
**माझीं प्रोत्साहक गाणीं। पडतां ओझरतीं कानीं।**
**स्फुरती वीरांचे बाहू,**
**म्हणति स्त्रिया रणिं जाऊं,**
**त्यजती मुलें दिला खाऊ,**

**गीत यापरिस**
**ऐकतां सरस**
**भीति दे अरिस**
**तेंच मम जिव्हाग्रीं नाचे । जगीं मी त्याकारितां वाचें ! ॥ १ ॥**

हें स्वतःचें गीत त्याला फार आवडत असे. Scott च्या Patriotism च्या गीतापेक्षांहि हें पद सरस वठलें आहे असें तो वारंवार म्हणत असे. मुलांनीं खाऊ टाकणें म्हणजे भक्तीची परमावधि होय ! शेले व बायरन हे त्याचे इंग्रजी-मधील आवडते कवि होते. मराठी जुन्या कवींपैकीं मोरोपंत, मुक्तेश्वर व श्रीधर यांवर त्याचा फार भर असे. आधुनिकांत त्र्यंबक बळवंत दाणी व घंटय्या हे त्याचे आवडते कवि होत. नवनीत हा त्याचा अत्यंत आवडता ग्रंथ. रिकाम्या वेळीं तो त्याचींच पारायणें करी. विषयानुरूप शब्द-योजना कशी करावी व शब्दांचें दौर्भिक्ष्य कसें टाळावें या दोन गोष्टी मला पंतांनीं शिकविल्या असें तो वरचेवर म्हणत असे. खरोखरच चिनचूक व विषयानुकूल व रसोत्कर्षक अशी शब्दयोजना करावी विनायकानेंच. कै. बालकवि हे आपली कविता बाहेर प्रसिद्ध करण्यापूर्वी विनायकाला दाखवीत असत. ' कसें हाकारूं ! शीडाविण दुर्बल तारू ' ही आपली कविता त्यांनीं विनायकास दाखविली तेव्हां त्यानें फक्त तींतील ' दुर्बल ' हा शब्द काढला व त्याचेऐवजीं ' दुबळें ' हा घातला. अवघा एकच शब्दाचा फरक; पण तेवढ्यानें त्या ओळीला किती स्वारस्य आलें याची कल्पना खऱ्या काव्यमर्मज्ञालाच होईल. असो.

विनायकाचें चरित्र व त्याची कविता यांचा मेळ घालणें सोपें नाहीं. विनायकाची वाणी जर इतकी ओजस्वी, गंभीर व राष्ट्रविचारांनीं व भावनांनीं थब-थबलेली आहे तर तिचा परिणाम त्याच्या स्वतःच्याच वर्तनावर कसा कांहीं झाला नाहीं ? श्रीसमर्थ-तुकारामादि सत्पुरुषांच्या वाणीनें जें कार्य झालेलें आहे व अद्याप होत आहे त्याचा शतांश तरी कार्यभाग या आधुनिक केशवसुत-विनायकादि राष्ट्र-शास्त्रिंच्या जिवंत वाणीनें केला आहे काय किंवा पुढें ती करील काय ? वगैरे-सारखे बरेच प्रश्न प्रस्तुत लेखकाकडे सोडविण्याकरितां आलेले आहेत. त्यांना वेगवेगळीं उत्तरें देत बसण्यापेक्षां या वाहत्या गंगेंतच हात धुऊन घेणें अव्यवहार्य

होणार नाहीं असें वाटतें. आचार, विचार व उच्चार हे तिन्ही शब्द अगदीं परस्परावलंबी आहेत. ही तीन शब्दांची त्रिपथगा ज्यानें आपल्या अंगीं मुरवली आहे त्याच्याच वाणीला तेज चढतें. त्याच्याच वाणीला जिवंतपणा येतो. छे! छे! पण हें काय झालें? शांतं पापं! विनायकाच्या काव्याचें विवेचन करण्याचें कार्य प्रस्तुत लेखकाचें नाहीं. प्रो. पटवर्धन व लेखकाचे परमस्नेही रा. रा. ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं तें काम आपल्या शिरावर घेतलें आहे. पैकीं प्रोफेसरसाहेबांचा लेख प्रस्तावनारूपानें या पुस्तकांतच समाविष्ट झाला आहे. माडखोलकरांचा लेख नवयुगांत प्रसिद्ध होऊनहि चुकला आहे. या उभयतांच्या मार्गांत अतिक्रमण करणें श्रेयस्कर नाहीं. विनायकाचें चरित्र कथन करणें हेंच कार्य प्रस्तुत लेखकाच्या वांट्याला आलें होतें, तें त्यानें यथाशक्ति व यथामति बजाविलें आहे.

---

## मराठींतील राष्ट्रीय कवितेचे पहिले व श्रेष्ठ उद्गाते

# कविनायक विनायक

## [१]

केशवसुत-टिळकांप्रमाणेंच आधुनिक कवितेच्या प्रवर्तनांत विनायकांचा भाग मानाचा व महत्त्वाचा आहे. केशवसुतांचा कल समाजसुधारणा व कविताविषयक नवीन दृष्टिकोन यांकडे होता, टिळकांचा ओढा धर्मसुधारणा व तत्त्वचिंतन यांकडे होता, तर विनायकांचा भर परतंत्रतेचा विनाश व राष्ट्रीयता यांकडे होता. परंतु केशवसुत व टिळक यांच्यासंबंधीं जितकें साहित्य लिहिलें गेलें आहे तितकें तें विनायकांवर लिहिलें गेलेलें नाहीं. यास कारण बहुधा त्यासाठीं आवश्यक असणाऱ्या साधनांचा अभाव हें असावें. त्यांच्या कवितासंग्रहांत निर्दिष्ट केलेलीं तीन पत्रें व ७३ लहानमोठ्या पूर्ण-अपूर्ण कविता येवढीच काय ती तत्संबंधीं साधनसामग्री आजपर्यंत उपलब्ध होती. त्यांच्या कवितेची दुसरी आवृत्ति प्रसिद्ध झाल्यानंतर धुळ्याचे त्यांचे स्नेही श्री. भट यांनीं म. सा. पत्रिकेच्या ७ व्या वर्षाच्या ३ ऱ्या अंकांत प्रसिद्ध केलेली 'कवि' कविता आणि श्री. देव यांनीं रामदास आणि रामदासींच्या ५० व्या भागांत प्रसिद्ध केलेली 'जीवित-महिमा' कविता, यांचा चित्रशाळेनें तिसऱ्या आवृत्तींत अंतर्भाव केलेला नाहीं. श्री. देव यांनीं दुसऱ्या आवृत्तींत अंतर्भूत असलेल्या 'दसऱ्याचें सोनें' व 'देशभक्ताचा अपूर्व सोहाळा' या दोन कवितांचे निराळे व अधिक पाठभेद दिले आहेत, तेहि विचारणीय आहेत. यांशिवाय 'काव्यरत्नावलि' व मासिक 'मनोरंजन' यांत ज्या कविता विनायकांच्या नांवानें मुद्रित झाल्या त्यांवरील मूळ टीपा आणि कांहीं अनामक कविता—ज्या शैलीवरून विनायकांच्या असाव्यात असा ग्रह होतो, त्यांचाहि विचार आवश्यक आहे.

विनायकांचा जन्म व स्कूल फायनलपर्यंतचें शिक्षण त्यांच्या गांवीं म्हणजे धुळ्यालाच झालें. एक असा व्यवसाय त्यांनीं केला नाहीं. आधीं पोलीस खात्यांत,

पुढें मिशनमध्यें मास्तर म्हणून आणि शेवटीं जहागिरदारांकडील कारभारी या नात्यानें त्यांनीं व्यवसायांतर केलें. मध्यंतरीं पोलीस खात्यांत असतांना कांहीं किटाळ आलें त्या वेळीं त्यांना फरारी व्हावें लागलें. बहुधा तेथेंच त्यांना साऱ्या संसाराचीं धुळधाण करणारीं वेश्या व वारुणी हीं व्यसनें जडलीं. तात्पर्य, त्यांचें सारें आयुष्य खानदेशांतच अस्थिरतेंत व व्यसनविवशतेंत व्यतीत झालें.

इतर अनेक समकालीन कवींप्रमाणें विनायकांनींहि आपल्या कवितालेखनाचा श्रीगणेशा संस्कृत व इंग्रजी कवितांच्या अनुवादानें केला असें दिसतें. विद्यार्थी असतांनाच त्यांनीं ग्रेच्या विलापिकेचें आणि ग्रिमच्या परिकथांचें रूपांतर केलें होतें असें त्यांच्या कवितेचे संपादक कै. अनंततनय यांनीं नमूद करून ठेवलें आहे. विनायकांनीं आपल्या एका पत्रांत ‘ तीर व गाणें ’ ही कविता करमणुकींत प्रसिद्ध केल्याचा उल्लेख केला आहे. ती बहुधा लॉंगफेलोच्या ‘ ॲरो ऍंड सॉंग ’ चें भाषांतर असावी. या अनुपलब्ध कवितांचा शोध आवश्यक आहे. सत्कार्योत्तेजक सभेच्या स्थापनेच्या दिवशीं ( १९ मे १८९३ ) विनायकांनीं सभेच्या स्थापनेचें अष्टक म्हणून जी ‘ जीवितमहिमा ’ कविता लिहिली आहे, तीहि लॉंगफेलोच्या सर्वश्रुत ‘ साम ऑफ लाइफ ’ चें भाषांतर आहे. त्यांचा ‘ राजा भोज ’ हा ली हंटच्या इंग्रजी ‘ आबू बिन ॲडम ’ चा मराठी अवतार आहे. तो बेमालूम व हुबेहूब असल्यामुळें मुळाइतकाच सुंदर आहे ! इंग्रजी भाषेचें मर्म ग्रहण करण्याची त्यांची शक्ति अचाट होती असें दिसतें. त्यांच्या ‘ ध्यास तो भास ’ ला बायरनच्या ‘ आल्प दि रेनिगेड ’ चा आधार आहे. परंतु साऱ्या कवितेंत कुठें पुसटहि त्याचा मागमूस लागत नाहीं. त्यांची ‘ स्वप्न ’ कविता ‘काव्यरत्नावलि’ व ‘ मनोरंजन ’ यांच्या एप्रिल १८९९ च्या अंकांत आलेली आहे. तिच्यावर त्यांनीं टीप दिली आहे :—‘ कवि प्रवासार्थ निघाला होता. एका पथिकाश्रमांत ( station ) वेत्रासनावर ( bench ) निद्रासुखार्थ पडला असतांना त्यास एक स्वप्न पडलें. ’ याच कवितेंत to go into the clutches of sleep या वाक्प्रचाराचें त्यांनीं ‘ क्षणभरी–सहज मज परी–झोंप आदरी––बाहुपाशांत ’ असें मराठीकरण केलें आहे. या कवितेच्या टीपेंत त्यांनीं ‘ स्टेशन ’ व ‘ बेंच ’ या इंग्रजी शब्दांसाठीं जे मराठी प्रतिशब्द निर्माण केले आहेत ते समर्पकता व

उचितता या दृष्टीनीं योग्य नाहींत असें कोण म्हणेल ? केशवसुतांच्या कवितांना इंग्रजीचा वास येतो, तो लपून राहात नाहीं. परंतु विनायकांच्या कवितांचें मूळ इंग्रजी आहे हें सांगूनहि खरें वाटत नाहीं हें विशेष आहे ! केशवसुतांप्रमाणें विनायकांचा इंग्रजीचा सतत व्यासंग असावा असें वाटत नाहीं. ' मोहानंतर ' या कवितेच्या टीपेंत त्यांनीं शेलेच्या एका उक्तीचा अवतरण म्हणून उपयोग केला आहे. परंतु ग्रे, हंट, लाँगफेलो इत्यादिकांच्या कवितांच्या अनुवादांवरून त्यांचें इंग्रजी ग्रंथांचें वाचन शाळेंतील क्रमिक पुस्तकांपर्यंतच सीमित असावें असें दिसतें.

विनायकांचें संस्कृत ग्रंथांचें अध्ययन इंग्रजीइतपतहि नव्हतें. शंकराचार्यांची ' परापूजा ' मुळांतच भावमधुर आहे. ती कदाचित् त्या काळच्या वहिवाटीप्रमाणें त्यांच्या नित्य पठनांत असावी. तेव्हां बहुधा तिच्यांतील भावार्थ मनांत मुरल्यामुळें त्यांनीं तिला मराठी रूप दिलें असावें. मात्र तें सहजतेमुळें अतिशय हृदयंगम झालें आहे हें कबूल केलें पाहिजे. त्यांनीं आपल्या कवितेंत लेखनाच्या ओघांत ' पश्चात्तापेन शुध्यति ', ' शैले शैले न माणिक्यं ' किंवा ' पयःपानं भुजंगमाम् ' अशा नीत्युपदेशक संस्कृत सुभाषितांचा यत्रतत्र अवलंब केला आहे. परंतु त्यांवरून त्यांचा संस्कृताचा व्यासंग प्रत्ययास येत नाहीं. तो त्यांच्या बहुश्रुततेचा द्योतक आहे एवढेंच काय तें !

विनायकांचा विद्याव्यासंग मर्यादित असला, तरी रसिकता चहुरंगी आणि बहुश्रुतता अनेकढंगी होती यांत शंका नाहीं. त्यांनीं विद्यार्थी असतांनाच Principles of Morality चें भाषांतर प्रसिद्ध केलें होतें. त्यांच्या लेखनांत Adversity never comes singly, History repeats itself, आप बीती, पर बीती इत्यादि इंग्रजी व हिंदी वचनांचीहि पखरण झालेली आहे. प्राचीन मराठी काव्यांच्या वेंच्यांचा ' नवनीत ' ग्रंथ त्यांच्या अत्यंत आवडीचा होता. एवढ्या थोड्या आणि तुटपुंज्या भांडवलावर केशवसुत आणि टिळक यांच्या कवितावास्तूंशीं बरोबरी करणारा स्वतंत्र वास्तु त्यांनीं आपल्या प्रतिभेच्या अलौकिक सामर्थ्यानें निर्माण केला हें पाहून मन आश्चर्यानें स्तंभित होतें.

विनायकांच्या ' वीरमती ' व ' मोहानंतर ' या कवितांच्या टीपांत हरिभाऊ

आपट्यांच्या ‘ रूपनगरची राजकन्या ’ व ‘ भयंकर दिव्य ’ या कादंबऱ्यांचा निर्देश आहे; ‘ गणिकोद्धार ’ ही कविता वासुदेवराव आपट्यांच्या ‘ अशोकचरित्रा’-वरून सुचल्याचा निर्देश आणि मेळ्यांतील एका कवितेवर लोकमान्य टिळकांच्या एका लेखांतील अवतरणाचा संदर्भ आहे—यांवरून करमणूक, विविध-ज्ञान-विस्तार, केसरी, मनोरंजन इत्यादि नियतकालिकांतच त्यांच्या प्रतिभेला भरपूर खाद्य मिळत असे. चालू परिस्थितीशीं समरसून जाण्याचें विलक्षण सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं होतें. आणि म्हणूनच स्वतःच्या काळासंबंधीं त्यांनीं जितकें व जसें लिहिलें आहे तसें तें त्यांच्या समकालीनांनीं लिहिलें नाहीं.

व्यावसायिक अस्थिरतेमुळें आणि व्यसनाधीनतेमुळें विनायकांच्या आयुष्याचा बराचसा काळ रिकामपणांत व मनमानेपणांत व्यर्थ गेला. त्यामुळें त्यांची साहित्यसंपदा संख्येनें अल्प आहे. परंतु ती अल्प आहे म्हणून यथातथाच आहे असें मात्र नाहीं. उलट ती तोलांत व मोलांत भारी आहे. तिचें नैसर्गिक वैरल्य आणि निरामय सारल्य अनुभविलें कीं, शेक्सपिअरच्या Sweet flowers are slow–And weed makes haste व The weakest kind of flower drops earliest to the ground या सूक्तींचें स्मरण झाल्याशिवाय राहात नाहीं.

[ २ ]

विनायकांच्या कवितेंत आत्माविष्कृति आहे. परंतु ती साक्षात् नसून पर्यायानें आहे. ‘ प्रत ’ या पत्नीस उद्देशून लिहिलेल्या कवितेंत आणि कै. दत्त यांस त्यांनीं ‘ अर्वाचीन कविते’साठीं कवितांची व चरित्राची मागणी केली असतांना धाडलेल्या पत्रांत विनायकांनीं स्वतःच्या दुर्दैवी व्यसनविवशतेचा उघड उघड कबुलीजबाब दिला आहे. परंतु ‘ अवंतिकेस ’, ‘ विरही ’ व ‘ स्वप्न ’ या कवितांत त्यांच्यांतला व्यसनासक्त प्रणयी आविर्भूत झाला आहे. यांपैकीं पहिली कविता त्या नांवाच्या विवक्षित व्यक्तीस अनुलक्षून लिहिली आहे हें तिच्यांतील

**रूप तुझें दिनरजनीं, वसतें हृदयीं नयनीं,**
**दिसतें स्वप्नीं, शयनीं, एकसारखें !**

> **रूप तुझें निरखावें, तव वचनामृत प्यावें,**
> **तव गुण गावे, ध्यावे, लालसा सखे !**
> **मज निंदो निंदी जन, धरिले मीं तुझे चरण,**
> **होवो झालें त्रिभुवन, त्यांत पारखें !**

या स्पष्टार्थबोधक उत्कट चरणांवरून कुणाच्याहि लक्षांत सहज येईल. हीच उत्कटता व तन्मयता ' विरही ' तील

> **वदवेना मला लागे हुरहुर जी तुजमुळें !**
> **चालतों बोलतों घरीं-हासतों वरी-अंतरीं परी**
> **अश्रु वेल्हाळे ! विरहानें तव गळे.**
> **तव हालचाल लाडकी-आठवुन सखी, एकसारखी**
> **जड क्षण झाले, कंठितसें प्रेमले !**
> **होईल कधीं दर्शन-दृढालिंगन,-प्रेमचुंबन**
> **चिंतनीं दोले-मन घेऊं लागलें.**
> **अलि असतों तर बैसुनी-वायुवाहनीं,-गात येउनी**
> **तुला वनमाले !-असतें मीं चुंबिलें**

या कडव्यांत आधिक्यानें ओतप्रोत आहे. विनायकाच्या या कविता विवाहित व्यक्तीस उद्देशून नाहीत हें खरें. सामाजिक नीतीच्या दृष्टीनें ते पत्नीच्या बाबतींत निर्घृण होते आणि त्यांचें वर्तन पवित्र नव्हतें यांत शंका नाहीं. परंतु काव्य हा रसास्वादनाचा एक विषय आहे अशा दृष्टीनें विचार केल्यास त्यांच्या या कविता कलंकित आहेत असें मानण्याचें कांहीं एक कारण दिसत नाहीं. त्यांत प्रस्फुरित झालेली प्रणयाची भावना उत्स्फूर्त व तीव्र आहे हें मानणें आवश्यक आहे. विनायकांच्या भ्रष्टतेचा चारचौघांत बभ्रा झाला होता असें दिसतें. त्यांचे वडील बंधु बलवंत जनार्दन करंदीकर एक नामवंत कवि होते. विनायकांना कविता-लेखनाचा मंत्र त्यांनींच दिला होता. त्यांना विनायकांसारख्या प्रतिभासंपन्न कवीच्या शीलाबद्दल वाईट वाटे. आपल्या लहान भावाची ' वेडा कोण ! ' व ' कवितेचा निरोप ' या दोन कवितांत त्यांनीं निर्भत्सना केली आहे. यांपैकीं पहिली कविता डिसेंबर १९०२ च्या मनोरंजनांत आहे व दुसरी अभिनवकाव्य-

मालेच्या तिसऱ्या भागांत आहे. 'वेडा कोण ?' ही कविता अभिनवकाव्य-मालेंत आहे असें अनंततनय सांगतात तें बरोबर नाहीं. मार्च १९०१ च्या काव्यरत्नावलींत बलवंतांची 'अनुताप' कविता आहे. तिच्यांत त्यांनीं आपण मदिरेच्या आहारीं गेलों होतों असें स्वतःच सांगितलें आहे. तेव्हां स्वानुभवावरून आपल्या अनुजाला त्यांनीं उपदेश करण्याचा प्रयत्न केला. 'वेडा कोण ?' या कवितेंत त्यांनीं विनायकांचा 'वेडा कोण ? अदर्शनियि गणिका मानी जिवाची सखी' किंवा 'तांब्याही उचलावया निज करीं साशंक झाला घरीं। उल्हासें रिझवावयास तिजला जो आणितां घागरी' असा उपहास केला आहे, आणि 'कवितेचा निरोप' या कवितेंत त्यांना 'तरी न मज राहवे; कर पुरे, नको छंद हा।–असो असुख तें मला; चिर सुखी परी तूं रहा।– जगांत न मिळेल मृच्छ-कटिकांतली नायिका –। गमे स्वहितसाधिका तुज वसंतसेनाच कां ?' असा उपदेश केला आहे. परंतु या उपहासाला अथवा उपदेशाला विनायकांनीं फारशी किंमत दिलेली दिसत नाहीं. बलवंतांची आणि विनायकांची नेहमींच चोंचाचोंची चाले. विनायकांनीं 'दोन पंथ' या कवितेंत बलवंतांना उत्तर दिलें आहे असें अनंततनय सांगतात. परंतु तें उत्तर जाहीर उपहासापूर्वींच डिसेंबर १८९८ च्या मनोरंजनांतील 'कुल आणि प्रीति' या कवितेच्याद्वारां विनायकांनीं दिलें असावें असें वाटतें. प्रस्तुत कविता निनांवी आहे. पण तिच्यांतील विषय, भाव, भाषा व शैली यांचा विचार केला कीं, ती विनायकांचीच असावी याविषयीं संशय उरत नाहीं. मार्च १९०३ च्या मनोरंजनांत 'वीर व भ्याड यांच्या वल्गनेमधील अंतर' या नांवाचें एक गीत आहे. याच अंकांत विनायकांची 'कवि व पोपट' ही प्रसिद्ध कविता आहे. गीत अगदीं हुबेहूब 'प्रभावती' नाटकांतील गीताच्या वळणाचें आहे. तेव्हां तें बहुधा विनायकांचें असावें. सप्टेंबर १९०० च्या मनोरंजनांत 'एक मित्र' या नांवानें 'पहिलें चुंबन' ही उत्कृष्ट कविता आहे. ती केशवसुतांची समजली जात होती. [पाहा–मनो. पुस्तक ११ भाग ७] टिळकांनीं ती आपली नसल्याबद्दल १९१७ सालीं जानेवारीच्या काव्यरत्नावलींत खुलासा केला होता. तीहि साकी हें वृत्त, भाव आणि भाषा यांवरून विनायकांची असावी असा अंदाज होतो. हीच कविता वाचून गोविंदाग्रजांना याच विषया-

वरली कविता सुचली असावी. ‘ कुल आणि प्रीति ’ ही संपूर्ण कविता आणि ‘ पहिलें चुंबन ’ या कवितेंतले कांहीं चरण पुढें उद्धृत करीत आहें. त्या कविता विनायकांच्या कशावरून तें शितावरून भाताची परीक्षा या न्यायानें तज्ज्ञांच्या लक्षांत आल्याखेरीज राहणार नाहीं.

## कुल आणि प्रीति

[ वीर शिरोमणि ]

“ निंद्य कुलोद्भव कशी तुला ती आवडली ? त्वन्मती--
जाहली काय तुला सोडती !
कोठें कुल तव ! कोठें विद्या ! कोठें कीर्ती सती !
उन्नती आलिंगी अवनती !
मिळतील कामिनी दुसऱ्या सुंदर तुला,
ज्या तुला शोभतिल उत्तम तव कुलशिला,
कां वेड्या ! भुलसी असल्या आपत्तिला,
जाणुनि सारें अंधपणें ही स्वीकारिसि दुर्गती ?
त्वन्मती—काय तुला सोडती ? ”
“ ईशकृपेनें उच्चनीचता झाली बघ संप्रती
नसे मम हृदयीं ही अभिमती.
ती चिखलांतोनी आली वर पद्मिनी,
कीं शिंपींतोनी मोती तेजोगुणी,
कीं मृद्राशींतुन अमृताची वाहिनी
राज्य पृथ्वीचें नको मला जरि मिळेल ती सन्मती
तिच्याविण जगणें केवळ मृती ! ”

## पहिलें चुंबन

पहिलें चुंबन प्रीतिलतेचा पहिला भर सुचवाया
शोभे पहिलें फूल विकसलें बाह्यांतर सुखवाया

**पहिलें चुंबन प्रियकर ओष्ठां प्रेमामृत जैं पिववी**
**एकव्रतता भंग पाप नच यांत मुळीं हा नय वी**
**सौख्यरवीच्या कुशल सारथे ! प्रथमचुंबना सखया !**
**संसारांतिल धन्य धन्य मम सुदिन आणिशी उदया**
**विरहागम जैं निष्ठुरतेनें बळेंचि हाकी दूर**
**ओंठ कोडगे प्रियाधरामृतपानीं असतां चूर**
**' शेवटचा हा ' म्हणत शेवटीं एक घेइ जैं घुटका**
**पहिलें चुंबन सुखनिधि साचा लावि परी तें चटका.**

पहिल्या कवितेंतील नीच कुलांतील स्त्रीचा उल्लेख आणि दुसऱ्या कवितेंतील एकव्रतताभंगाचा उल्लेख विनायकांच्या बाबतींत तंतोतंत लागू पडतात. दुसऱ्या कवितेंतील शेवटची कल्पना त्यांच्या ' जोहार ' या सुप्रसिद्ध कवितेंत पुनरुक्त झालेली आहे. तेव्हां या कवितांचें कर्तृत्व विनायकांकडे असावें असा कयास केला तर तो चुकेल का ?

विनायकांच्या या साऱ्याच प्रणयपर कविता प्रामाणिकतेमुळें व प्रांजलतेमुळें जितक्या सुंदर तितक्याच सरस उतरल्या आहेत. अर्थात्, त्यांची स्तुति म्हणजे विनायकांच्या वर्तनाचें समर्थन असें मात्र नाहीं. विनायकां-संबंधीं बोलतांना हरिभाऊ आपटे त्यांच्या काव्यांची तारीफ करीत, पण शीलासंबंधीं मात्र ते तिरस्कार प्रकट करीत. आणि गोविंदराव कानिटकर म्हणत कीं, त्या कवीचीं काव्यें वाचावीं, पण त्याचें मुखावलोकन करूं नये, असें. कै. ल. ग. लेले यांनीं विनायकांच्या कवितेवरील आपल्या परीक्षणांत नमूद करून ठेविलें आहे. [ पाहा : वि. ज्ञा. वि., ऑक्टो., १९२१ ] स्वतः विना-यकांना आपल्या वर्तनाचा पुढें पुढें पश्चात्ताप झाला असावा असें वाटतें. कारण ' गणिकोद्धार ' व ' मोहानंतर ' या आपल्या अप्रतिम कथाकाव्यांत त्यांनीं ' पश्चात्तापें पापें जळतीं; निर्मल होय स्वांत ' व ' शुकाचा मनोजय आणि विश्वामित्राचा तपोभंग ' यांना सारखेंच महत्त्व आहे, असे उद्गार काढले आहेत. त्यांनीं एका पत्रांत ' स्वत्वरक्षण ' व ' पातकांचा झाडा ' या काव्यांचा निर्देश केला आहे. तीं त्यांच्या कल्पनेंत तशींच राहिलीं असें दिसतें. त्यांच्या नांवावरून

त्यांतहि अनुतापदग्ध हृदयाचे निःश्वास उमटले असते असें वाटतें. त्यांची 'स्वप्न' ही कविता दिसावयास विनोदी दिसते. परंतु तिच्या शेवटीं त्यांनीं

**'संसार दिसे सुंदरसा–झांकून चालतां डोळे—मानिनी !**
**प्रेमाच्या लीला गमती–जागृतींत चेष्टा चाले—मानिनी !**
**संसृती–जगाची स्थिति–स्वप्नरूप ती–मानुनी सत्य**
**चाललों पहा आहोंत—मानिनी !**

हा जो साररूप निष्कर्ष काढला आहे, तो त्यांच्या कटु अनुभवाचेंच फळ आहे. आपल्या दोषांची त्यांना जाणिव नव्हती असें नाहीं. आपण अस्थिर व निष्क्रिय आहों हें त्यांना ठाऊक होतें. म्हणूनच 'चिमणी' ला उद्देशून ते म्हणतात कीं—

**श्रम उदरास्तव करितांना, स्वच्छंदें मारी ताना**
**धन्य जिला धरितां आलीं, व्यवधानें एका कालीं**
**असें पुण्य गांठीं कोठें ? कुठें भाग्य माझें मोठें ?**
**कीं एके कालीं वाहूं उदरभार गाणीं गाऊं**
**एक कराया लागावें, दुज्याकडे तों मन धावे,**
**साधेना एकही परी, अपूर्णता मनुजता खरी !**
**स्वच्छंदें गाणीं गातां, पडते उदराची चिंता;**
**जातां उदराच्या मागें, शब्द दूर पळती रागें !**

आणि शेवटीं स्वतःच्या मनाला उपदेश करतात कीं, 'यास्तव मना ! करावा यत्न तुवां सत्पथास लागाया । गेले जावोत, पुढें दवडावे दिन न आपुले वायां !' विनायक जात्याच स्वच्छंदी, आनंदी व विनोदी असल्यामुळें त्यांच्या काव्यांत कुठें चिरनिराशेच्या वृत्तीचें सांवट आढळत नाहीं. उलट धीराचे व आशावादाचे उद्गार मात्र कानीं पडतात :

**चित्त स्थीर असूं दे, व्हायाचें व्हावयाविना न टिके**
**टाळाया तें कोणी यत्न करो, ठरति सर्व ते लटिके.**
**लागो, लागेल तुला दुःखांतच सर्व काल कंठावा**
**नाहीं होणार न हो सौख्याचा एक शब्द ही ठावा.**

**न मिळो न मिळेल तुला या लोकीं कीर्ति-मान आमरण**
**किंवा न करोत तुझें मरणानंतर जगीं कुणी स्मरण.**
**कर्तव्यकर्म केलें त्यायोगें होय जें समाधान**
**तें पारितोषिक तुझें, त्याजपुढें तुच्छ होय धनमान.**
**रात्र सरे, दिन उगवे, ऋतुक्रमें वृक्षवाळि पालवती**
**सत्कृति यथावकाशें फळास येणार त्यापरी जगतीं**
**स्वज्ञाति रक्षिल्याचें, देशा स्वातंत्र्यदान दिधल्याचें,**
**अंतीं तुझेंचि हें यश, याविण सार्थक न अन्य जन्माचें.**

तात्पर्य, विनायक स्वभावतांच सत्प्रवृत्त, सश्रद्ध व सुधीर होते. परंतु परिस्थितीच्या फेऱ्यांत त्यांच्या या स्वभावगुणांची माती झाली. प्रतिकूल तापदायक परिस्थितींतहि ते आपली वृत्ति प्रसन्न ठेवीत असत. एकदां त्यांची चिलीम हरवली. तिच्यावर त्यांनीं ' चिमा ' ही अत्यंत विनोदी कविता लिहिली आहे. तिच्यांत त्यांनीं आपणांस फरारी होऊन भटकावें लागलें त्या वेळीं चिलिमेनें कशी साथ दिली याचें वर्णन ' मातें जी न विसंबली भटकतां पोटार्थ रानेंवनें । ऐश्वर्यी व्यसनीं अशी मजसवें जी नांदली सारखी—' या चरणांत केलें आहे. ' स्वप्न ' ही कविताहि त्यांच्या विनोदी वृत्तीची साक्ष आहे. तिच्यांतला अंतिम विरक्तियुक्त विचार विनायकांना एक श्रीमंत एका वारयोषितेच्या काळ्याकुट्ट कन्येवर आसक्त झाले त्यावरून सुचला असें त्यांचे स्नेही व चाहते काव्यरत्नावलीकार सांगतात. ( पाहा : काव्य-रत्नावलि, एप्रिल १९२२ ). परंतु वास्तविक त्यांत विनायकांच्या मूळच्या सत्प्रवृत्त विरक्त वृत्तीचीच अंधुक व अस्पष्ट छाया आहे.

[ ३ ]

विनायकांच्या कथा-काव्यांत त्यांच्यांतील थोर व कुशल कलाकाराचें दर्शन घडतें. ध्यास तो भास, गणिकोद्धार, वीरमती व मोहानंतर या त्यांच्या चार कथा-काव्यांचीं कथानकें त्यांनीं अनुक्रमें बायरनचा कवितासंग्रह, वा. गो. आपट्यांचें अशोकचरित्र, रूपनगरची राजकन्या व वीरबाला हें गुजराथी नाटक आणि पांडव-प्रताप अध्याय ५९ यांवरून घेतलीं आहेत. परंतु कथांच्या निरनिराळ्या सूत्रांची कौशल्यानें गुंफण करून त्यांना मनोवेधक रंग देण्याचें अजब कसब मात्र खास

विनायकांचें आहे. आपल्या एका पत्रांत त्यांनीं या कथाकाव्यासंबंधीं ' हल्लींच्या लोकस्थितीस कांहीं विशेष बोध काव्यद्वारां व्हावयास पाहिजे आहे असें मी समजतों. तिकडे माझ्या बहुतेक कविबंधूंचें अलक्ष दिसतें ' असा मजकूर लिहिला आहे. यावरून त्यांनीं या कथा हेतुपुरस्सर रचल्या आहेत हें उघड आहे. याच पत्रांत त्यांनीं पुढें आपण या कथांत विरक्ति आणि वीरश्री यांना प्रामुख्य देत असून शृंगार हा अंगभूत ठेवीत असल्याचा उल्लेख केला आहे. त्यावरूनहि विनायकांच्या मूळ स्वभावावर चांगलाच प्रकाश पडतो. ' ध्यास तो भास ' मध्यें त्यांनीं परधर्मातील जिणें जगण्यापेक्षां स्वधर्मांतलि मरणें बरें हें तत्त्व गोंवलें असून त्याला अकबराच्या काळीं बरेच रजपूत सरदार धर्मांतर करीत त्या ऐतिहासिक वातावरणाची डूब दिली आहे. एका सरदाराला त्याची प्रेयसी धर्मांतरापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करते. परंतु ती केवळ एक स्त्री आहे या कल्पनेनें त्याच्यांतला पुरुष तिच्या हितोपदेशाची अवहेलना करतो आणि स्वतःचें कायमचें नुकसान करून घेतो. या काव्यांतील प्रेयसीच्या सुंदरतेच्या वर्णनास बायरनच्या आल्प दि रेनिगेडचा आधार आहे. विनायक शब्दांच्या रंगांनीं चित्र कसें सजीव करीत हें त्यांतील पुढील चरणांवरून सहज कळेल :

**' होता गुलाब गालीं–ओष्ठावरती तशी तिच्या लाली**
**चिंतेचा ढग भालीं धरि त्यावर सांवली परी काळी**
**नेत्रांत तेज होतें, परि निश्चल त्या सरोवरावाणी,**
**चंचलता मावळली, शून्यपणा काळजी तया आणी.**
**साधेंसुधेंच पातळ, हिरवी अंगांत कंचुकी ल्याली,**
**कृष्ण कुरल केश तिचे ते अस्ताव्यस्त विखुरले भालीं.**

गणिकोद्धारांत त्यांनीं पश्चात्तापानें चित्त शुद्ध होतें, हें तत्त्व विशद केलें आहे. मथुरेची वासवदत्ता गणिका उपगुप्त नांवाच्या बौद्ध भिक्षूवर अनुरक्त असते. पण तिच्या निंद्य वासनेला तो स्वतःचा बळी देत नाहीं. ती एकदा आपल्या एका धनिक प्रियकराबरोबर क्रीडा करीत असतांना दरवडेखोर त्याचा खून करतात. त्याचा आळ तिच्यावर येतो. त्या काळच्या पद्धतीप्रमाणें तिची नासा व स्तनें छेदण्यांत येतात आणि तिला स्मशानांत टाकण्यांत येतें. तेथें उपगुप्त जातो व

तिला हिताचा बोध करतो. शेवटीं पश्चात्तापानें ती पुनीत होते. हें कथाकाव्य आरंभापासून अखेरपर्यंत रसानें तुडुंब आहे. कथेचा आरंभ कलात्मक आहे. स्मशानांतील भीतिदायक वातावरणाच्या पार्श्वभूमीवर हतभागिनी वासवदत्तेच्या अपमानाचें व्यथित चित्र रंगवण्यांत आलें आहे. ती कामातुर होऊन उपगुप्तापाशीं सहवासाची याचना करते. परंतु तो नैष्ठिक भिक्षु तिकडे लक्षहि देत नाहीं. त्या प्रसंगाच्या स्मृतीचें चित्र विनायकांनीं अगदीं अलगद् व हळुवारपणें काढलें आहे :

**खिडकींत उभी असतां पाहत निज रमणाची वाट**
**मदनमनोरम मूर्ति आपुली आली दृष्टिपथांत.**
**जलौघ वाहे सभोंवतींची काय वनश्री त्यास ?**
**तशी दृष्टि आपुली न पाहे तरुणी भृकुटि-विलास.**
**वरून मीं फेकिलें कराया खूण पुष्प आरक्त**
**पुष्प नव्हे तें प्रणयलेख तो वा हृदयच अनुरक्त**
**न कळत गमतें, पडे आपला पुष्पावर त्या पाय,**
**हाय ! केवढा तेणें बसला मम हृदयावर घाय !**

वासवदत्तेच्या या शृंगारस्मृतीप्रमाणें उपगुप्ताची विरागवाणीहि जशी गंभीर तशीच सुंदर आहे. त्यांवरून प्रत्यक्ष विनायकांच्या अंतःकरणांत अनुराग व विराग यांचा कसा संघर्ष चालत असेल त्याची थोडी फार कल्पना येते.

**यौवन चंचल चंचल जैसा असतो संध्याराग**
**कसा टिकावा चांचल्यावर केलेला अनुराग ?**
**सुंदरपणही भ्रम नयनांचा; मूढ समज हृदयाची !**
**देशोदेशीं भिन्न कल्पना प्रचरे सौंदर्याची**
**आणि संपदा काय ? वेसवा फिरणारी बाजारीं !**
**बऱ्या त्या तरी, नसती इतक्या मूढ, अंध अविचारी**
**त्यांतही निघे वसंतसेना गुणलुब्धा एकादी**
**परी संपदा मूर्ख, दुर्गुणी जनां मात्र आराधी.**
**यौवन सरलें, स्वरूप विरलें, दिला धनानें गोता**
**अशाश्वताला भुललिस गणिके ! झाला शाश्वत तोटा**

विनायकांचे वडील बंधु बलवंत यांनीं 'कवितेचा निरोप' या कवितेंत वसंतसेनेचा उल्लेख केला आहे तो बहुधा येथूनच उचलला असावा. विनायकांनीं या कवितेचें कथानक वासुदेवराव आपट्यांच्या 'अशोकचरित्रां'तून घेतलें आहे. वासुदेवराव बंगालीचे ज्ञाते होते. तें चरित्र लिहितांना त्यांना बंगाली वाङ्मयाचा उपयोग झाला होता. बंगालींत याच कथेवर रवींद्रनाथ टागोर यांची एक कविता आहे. तिचें तामीळमध्यें श्री. साळी यांनीं रूपांतर केलें आहे. तामीळवरून याच कवितेचें मराठी रूपांतर करण्यांत आलें आहे. तें नोव्हेंबर १९३७ च्या 'विहंगमां'त आलेलें आहे. बंगालीवरून 'अभिसाररात्रीं' हा समवृत्त अनुवाद सौ. सुशीला लघाटे यांनीं केला असून तो मे १९४६ च्या 'सह्याद्री'त प्रसिद्धि पावला आहे. विनायकांना टागोरांची कविता माहीत नव्हती. परंतु टागोरांच्या अभिसाररात्रींपेक्षां विनायकांचा गणिकोद्धार हा कलासौंदर्य आणि बोधमाधुर्य या दोन्ही दृष्टींनीं अधिक सुंदर आहे. जिज्ञासूंनीं वाटल्यास त्यांचा तौलनिक विचार करून पाहावा. 'मोहानंतर' या कवितेंतहि विनायकांच्या मनांतील आसक्ति व विरक्ति यांचें द्वंद्व प्रतिबिंबित झालें आहे. स्त्रीच्या साहचर्यांत पुरुष कर्तव्यपालन कसें विसरतो हें तत्त्व विशद करण्यासाठीं त्यांनीं या कवितेंत जुन्यापुराण्या सुधन्वाख्यानाचा उपयोग करून घेतला आहे. पुढील चरणांत तर त्यांनीं जणूं कांहीं स्वतःचाच कडवट अनुभव स्पष्ट केला आहे असें वाटतें :

**स्त्रीच्या ठायीं अन्य वस्तुपरि अमृतविषाला थार**
**स्त्रीच्यापायीं तरले थोडे, बहुत बुडाले ठार !**
**"अमृत" कशाचें ! सुराच भरली आहे स्त्रीच्या ओंठीं**
**विचार पळवी, निशा तियेची, बुद्धि उपजवी खोटी !**

वीरमती या कथाकाव्यांत मात्र प्रेम व पराक्रम यांचें द्वंद्व दाखविलें आहे. जोधपूरचे महाराज जसवंतसिंह हे एकदां रणांगणांतून पळता पाय काढतात हें त्यांच्या महाराणीला रुचत नाहीं. ती राजधानीचे दरवाजे बंद करते आणि त्यांची निर्भर्त्सना करते. त्यामुळें चेव येऊन ते पुन्हां समरास जातात व विजयी होऊन परत येतात, हा कथाभाग या काव्यांत चित्रित करण्यांत आला आहे. यांतील महाराणीनें केलेल्या निर्भर्त्सनेच्या भाषणांत त्वेष व संताप असून त्यामुळें

अपमानित झालेल्या महाराजांच्या उत्तरांत आवेश व उत्साह आहे. विनायक हे महाराष्ट्रास राष्ट्रीय कवि म्हणूनच परिचित आहेत. तेव्हां अनुरक्ति व विरक्ति यांप्रमाणें त्यांच्या काव्यांत वीरोक्तीहि आढळते.. विनायकांच्या बाबतींत कित्येकदां शील व साहित्य यांचा अन्योन्य संबंध आहे किंवा नाहीं असा प्रश्न उपस्थित करण्यांत येत असतो. वास्तविक तो उत्पन्न होऊं नये. कारण शील याचा अर्थ जसें 'चारित्र्य' तसा 'स्वभाव' हाहि आहे. आणि स्वभाव हा चिरस्थायी स्वरूपाचा असल्यामुळें अक्षर साहित्यावर त्याचा ठसा उमटल्याखेरीज राहात नाहीं. विनायकांचा ओढा स्वभावतःच विक्रमाकडे व वैराग्याकडे होता. तेव्हां त्यांचा त्यांच्या काव्यांत परिपाक उतरावा यांत कांहीं आश्चर्य नाहीं. वृत्ति ही तात्कालिक असते, आणि तिच्या ताब्यांत माणूस कित्येकदां अनर्थ करून बसतो. विनायक हे चंचल असल्यामुळें क्षणैक वृत्तीला वश होत. या विधानास पोषक असा एक प्रसंग काव्यरत्नावलीकारांनीं दिला आहे. विनायकांची 'वीरमती' वाचून वऱ्हाडांतील एक श्रीमान् वाचक बेहद्द खूष झाले; आणि विनायकांची प्रत्यक्ष गांठ घेण्यासाठीं ते खानदेशांत आले. विनायकांचा त्यांनीं पुष्कळ शोध घेतला, परंतु विनायक बेपत्ता होते. शेवटीं ते त्या रसिक वाचकांना एका सर्कसच्या तंबूंत आढळले. विनायकाला पाहतांच त्या रसिक गृहस्थांनीं वीरमतीची स्तुति केली आणि विनायकांसंबंधीं गाढ आदरभाव व्यक्त केला. परंतु त्याच्या मोबदल्यांत विनायकांनीं मात्र भाषणविपर्यास करून त्या रसिकांचा हिरमोड केला. त्यामुळें त्या रसिकांना कवीचें काव्य व प्रत्यक्ष कवि यांच्यांतील तफावत पाहून काय वाटलें असेल याची कल्पनाच केलेली बरी ! [ पाहा : काव्यरत्नावलि, एप्रिल १९२२ ] विनायकांचीं सारींच कथाकाव्यें त्यांचीं वैशिष्ट्यपूर्ण कथानकें, वेचक व वेधक प्रसंग, चटकदार कथनशैली, साधी, सोपी व प्रवाही भाषा, सूचक अभिव्यक्ति आणि योग्य संयम यांमुळें कलात्मक उतरलीं आहेत.

[ ४ ]

विनायकांची स्त्रीदाक्षिणता त्यांनीं ऐतिहासिक स्त्रियांवर जीं आठ गाणीं रचलीं आहेत त्यांतहि व्यक्त झाली आहे. या आठ स्त्रियांपैकीं संयोगिता, पद्मिनी, पन्ना व कृष्णाकुमारी या चार राजस्थानच्या इतिहासांतील आहेत; दुर्गावती ही एक

मध्यप्रदेशाच्या इतिहासांतील आहे आणि तारा ही काल्पनिक आहे. त्या कालीं कर्नल टॉडचें ॲनल्स ऑफ राजस्थान हें पुस्तक फारच लोकप्रिय होतें. त्यांतील कथा मराठी क्रमिक पुस्तकांत होत्या. त्यांना विनायकांनीं गीतांचें स्वरूप दिलें आहे. अहल्याबाई होळकर यांचें चरित्र तर सर्वश्रुतच आहे. हिरकणीची कथा ही आख्यायिकेच्या रूपानें प्रसृत आहे. परंतु विनायकांची ही कविता अपूर्ण आहे. दुर्गावतीची कथा 'आल्हा' मुळें हिंदुस्थानभर पसरली आहे. तारेची कथा मॅकमिलन आणि कंपनीच्या टेल्स ऑफ इंडियन शिवेलरी या पुस्तकांत आहे. त्या पुस्तकाचें मराठी भाषांतर 'वीर योद्ध्यांच्या शौर्याच्या गोष्टी' या नांवानें कै. ह. रु. दामले यांनीं केलें होतें. त्यावरून किंवा मुळावरून विनायकांनीं ही कथा घेतली असावी. विनायकांचीं हीं सारीं गाणीं सर्वत्र सारखींच सरस व सुंदर आहेत असें मुळींच नाहीं. त्यांनीं तीं विशिष्ट उद्देशानें प्रेरित होऊन रचलीं होतीं. यांपैकीं अहल्या हें पहिलें गाणें जुलै १८९८ च्या काव्यरत्नावलींत आलेलें आहे. त्यावर टीप आहे. तिच्यांत विनायकांनीं 'आपल्या देशास भूषणभूत झालेल्या या स्त्रीरत्नांचा इतिहास आपल्या मुलीबाळींच्याहि तोंडीं बसावा' असा आपला हेतु स्पष्ट केला असून, पुढें संपादकांनीं 'हा प्रयत्न वाचकांस आवडल्यास कवि आपला उद्योग चालूं ठेवतील' असें आश्वासन दिलें आहे. त्या काळच्या स्त्रियांत साक्षरतेचें प्रमाण जवळजवळ शून्य होतें. परंतु त्यांच्यांत, गाणें रामाचें, धावा द्रौपदीचा, विलाप दमयंतीचा—अशा प्रकारचीं गाणीं तोंडपाठ करून तीं म्हणण्याचा प्रघात फार होता. विनायकांनीं त्याचा आयता फायदा मिळावा आणि स्त्रियांसमोर धीरोदात्त आदर्श राहावा म्हणून हा उद्योग आरंभला होता. या गाण्यांत जागजागीं अर्थांतरन्यास साधून सुबोध उपदेश केला आहे. आणि मधूनमधून स्वतःचा व्यक्तिगत अनुभव पुढीलप्रमाणें प्रकट केला आहे :

**'जो परनारीचा मनीं धरी अभिलाष**
**होईल यशाचा लाभ कुठून तयास ?'**

किंवा,

**'स्त्रीच्या ठायीं दलपतसम जो होतो लंपटमती**
**जीवित्वाला, सर्वस्वाला मुकतो तो शेवटीं.'**

विनायकांनीं चिकाटीच्या अभावीं अशा प्रकारचीं अधिक गाणीं लिहिलीं नाहींत. त्यांची 'जोहार' ही कविता याच गीतांत अंतर्भूत केली पाहिजे. तिच्यांत 'धन्य तेच भूमितलीं पाश जयीं तोडीला' हें तत्त्व मांडलें आहे. 'जोहार' हा बहुधा 'जयहर' चा अपभ्रंश असावा. एकलिंगजी हें रजपुतांचें कुलदैवत. 'जयहर' हा त्याचा जयजयकार. तोच मराठ्यांनीं 'हर हर महादेव' या शब्दांत प्रसारित केला. विनायकांचीं हीं गाणीं वाचून काव्यरत्नावलीच्या संपादकांना एका वाचकानें लिहिलें होतें—'ह्या कवीच्या कवितेस कांहीं निराळेंच वळण आहे असें दिसलें. ऐतिहासिक स्त्रियांविषयीं अत्यंत प्रेमानें व आदरानें भरलेलीं हीं गाणीं प्रत्येक स्त्रीनें पाठ करण्यासारखीं आहेत व कवीचा हा उद्योग स्तुत्य आहे व जागजागीं सार्वत्रिक सिद्धान्त गुंफण्याची कवीची हातोटी प्रशंसनीय आहे.' [ पहा : का. र. डिसें. १८९९, वर्ष ११ वें, साल अखेर ] स्त्रियांविषयीं दाक्षिण्य दाखवितां दाखवितां विनायकांनीं पुरुषांच्या बेजबाबदार, स्वार्थी, कपटी व लोलुप स्वभावावर बोट ठेवण्यास मागें पुढें पाहिलेलें नाहीं. 'स्त्री आणि पुरुष' ही त्यांची कविता ध्वनिकाव्याचा एक उत्कृष्ट मासला आहे. त्यांत केलेलें पुरुषाचें—

**'कौतुकला–हंसला, बाग मनीं ठसला.**
**नव फुललें–पुष्प एक त्या आवडलें.**
**प्रेमभरें–खुडिलें तेणें तें स्वकरें**
**हुंगियलें–चुंबियलें–माथां धरिलें,**
**क्षणमात्रें–होय नकोसें तें त्यातें**
**कुसकरिलें–फेंकुनि धरणीवर दिधलें**

हें वर्णन किंवा 'सुवास' कवितेंतलें त्याच्याच संबंधींचें—

**वागविली निज हृदयप्रांतीं**
**भक्तीनें रमणाची मूर्ती,**
**काय होय तें परि पुरुषाला,**
**नवपुष्पावरच्या भ्रमराला,**
**विमुख तिला तो हाय! जहाला,**
**अंतरली स्त्री सर्वस्वाला.**

हें वर्णन, अथवा, 'स्त्रिया भाबड्या जगतीं कपटी पुरुषाची जाती' हें वर्णन वाचलें म्हणजे words are the voice of heart असें जें शेक्सपिअर म्हणतो, त्याप्रमाणें हे शब्द म्हणजे विनायकांच्या अंतःकरणाचे पडसाद तर नसावेत ना असा प्रश्न मनांत उभा राहतो !

[५]

चिमणी, प्रीति निमाली तर, सुवास, स्त्री आणि पुरुष व नदी आणि कवि या नेमक्या, हाताच्या बोटांवर मोजतां येण्याजोग्या विनायकांच्या कविता त्यांच्या नेहमींच्या वहिवाटीहून व ठराविक धाटणीहून कांहीं बाबतींत अगदीं वेगळ्या व आगळ्या आहेत. त्यांचा तोंडवळा थोडाफार केशवसुतांच्या कवितांच्या तोंडवळ्याशीं मिळतो जुळतो. विनायक व केशवसुत दोघेहि खानदेशांत होते. केशवसुत कांहीं काळ भडगांवास व कांहीं काळ फैजपुरास होते. विनायकांचा तर खानदेशांत सर्वत्र संचार असे. तेव्हां त्यांच्या वारंवार भेटीगांठी पडत आणि काव्यविषयक चर्चा झडत. त्यामुळें विनायकांच्या कवितांवर केशवसुतांच्या लेखनपद्धतीचा परिणाम झाला असल्यास नवल नाहीं. विनायकांची आणि केशवसुतांची अगदीं पहिली भेट १८९१।९२ सालीं मुंबईस झाल्याचें अनंततनयांनीं नमूद केलें आहे. महाराष्ट्राचे हे दोघेहि भावी कविश्रेष्ठ गप्पागोष्टींत इतके गुंग झाले कीं, विनायकांना परीक्षेस जाण्याचें भान राहिलें नाहीं आणि केशवसुतांना कचेरींत जाण्याचा विसर पडला. विनायकांच्या वर्तनांतील स्वैरता व काव्यांतील उत्कटता यांचें बायरनच्या वर्तनाशीं व काव्याशीं साम्य आहे असें पाहून केशवसुतांनीं त्यांना 'महाराष्ट्राचा बायरन' ही पदवी गमतीनें बहाल केली होती असें रहाळकरांनीं लिहून ठेवलें आहे [ पाहा : मनोरंजन, जुलै १९१९ ]. विनायकांना केशवसुतांबद्दल आत्मीयता व आदरभावना होती. केशवसुत वारले तेव्हां त्यांनीं मनोरंजनाचे संपादक मित्र यांना ४।१२।१९०५ रोजीं जें पत्र पाठविलें, त्यांत ती व्यक्त झाली आहे : " केशवसुताची राहणी साधी, वर्तन पवित्र, विचार काव्यमय व भाषाशैली मनोवेधक असे. तो बोलतांना खालीं पाहून बोलत असे. तथापि केव्हां केव्हां तो वर मान करून पाहात असे, तेव्हां त्याचे पाणीदार—हें पाणी खरोखरच अलौकिक होतें—डोळे श्रोत्यांच्या हृदयाचा वेध करून टाकीत. " [ पाहा : मनोरंजन, पु. ११, भा. ७ ] केशवसुतांच्या

सहवासांतच विनायकांना ‘ गाण्याचें गाणें ’ हें गाणें स्फुरलें असावें. कारण इमर्सन हा अमेरिकन दार्शनिक व कवि केशवसुतांचा आवडता ग्रंथकार होता. त्याच्या पुढील ओळी केशवसुतांच्या मुखानें विनायकांच्या कानांवर पडल्या असाव्यात. त्या ऐकूनच विनायकांना स्फुरण चढलें असावें. विनायकांचें ‘ गाणें ’ आहे तें असें :

**गाण्याचें गाणें–गाऊं गाण्याचें गाणें !**
**अंकावरती घेउनि आई**
**तयनातें करिते अंगाई**
**प्रेमरसाचें गाणें गाई**
**हारपती भानें–गाऊं गाण्याचें गाणें !**
**खवळे जलधी, उडवी गगनीं,**
**कंदुकापरी सलील तरणी,**
**न भी खलाशी पडला व्यसनीं,**
**गीत समाधानें–गाऊं गाण्याचें गाणें !**

आणि इमर्सनच्या ओळी आहेत त्या अशा—We are lovers of rhyme and return, period and musical reflection. The babe is lulled to sleep by the nurse's song. Sailors can work better for their yo-heave-do.

विनायकांच्या ‘ कवि ’ या कवितेंतील

**सहज करीं जी धरितों माती**
**देतों तिजला सुवर्णकांती**
**माझ्या कौशल्यबलें-वसुंधरा ही झाली नामी**

ही कल्पना केशवसुतांच्या ‘ कवि ’ या कवितेमधील

**चाले तो धरणीवरी तर पहा ! जेथून तो चालला**
**धूली तेथिल होतसे कनकिता !—घेऊं नका भ्रांतिला**

या कल्पनेवरून सुचली असावी हें अगदीं उघड आहे. विनायकांची ‘ सुवास ’ आणि केशवसुतांची ‘ सतारीचे बोल ’ या कवितांतहि पुष्कळ प्रमाणांत साम्य आहे. साऱ्या विश्वाच्या मुळाशीं जी नियामक शक्ति आहे तिचा बोध एकाला अतिशय तरल व सूक्ष्म अशा सुवासाच्या द्वारां झाला, तर दुसऱ्याला तो तरल व सूक्ष्म अशा सतारीच्या स्वरांच्या द्वारां झाला. केशवसुतांच्या कवितेचा आरंभ ‘ विमनस्कपणें स्वपदें उचलित । रस्त्यांतुन मी होतों हिंडत ’ असा आहे, तर विनायकांच्या कवितेचा आरंभ ‘ हिंडत असतां निर्जन रानीं । स्वैरगतीनें गुंगत गाणीं । ’ असा आहे. ‘ जड तें खोटें हें मात्र कसें । ’ तें न कळल्यामुळें केशवसुतांची स्थिति ‘ काय करावें ? कोठें जावें ?। तुमजे मजला कीं विष खावें ’ अशी होते, तर जगांत रसिक नाहींत हें पाहून विनायकांची स्थिति ‘ काय अशा जनतेंत रहावें ? काय पहावें ? काय चहावें, ’ अशी होते. केशवसुतांच्या कवितेंत ‘ दिडदा दिडदा दिडदा दिडदा ’ असा जसा एकसारखा घोष आहे, तसा तो विनायकांत ‘ व्यर्थ हिंडलों झालों वेडा । वेडा वेडा वेडा वेडा ’ असा एकदांच आहे. मात्र केशवसुतांच्या कवितेंतील ‘ तों मज गमलें विभूति माझी । स्फुरत पसरली विश्वामाजी । दिक्कालासहि अतीत झालों । उगमीं विलयीं अनंत ठेलों । ’ ही दिव्य अनुभूति विनायकांच्या कवितेंत नाहीं. केशवसुत अंतर्लक्षी होते. विनायक बहिर्लक्षी होते. आणि म्हणूनच विनायकांनीं कवितेच्या शेवटीं ‘ स्वानुभूतिवासाचें दान । करावयाला जोंवरि ये न । तोंवरि कवितालतिकेवरतीं । कर्णिकार सुमनांची भरती ’ असे विनम्र उद्‌गार काढले आहेत. केशवसुतांच्या ‘ भृंगा ’त ‘ गा तूं गा नादी भ्रमरा ! । मी गणमात्रा जुळणारा ’ असा विनम्र भाव आहे. विनायकांनीं ‘ चिमणी ’त त्याचाच ‘ उडती बागडती पक्षी । तत्परता ठेवुन भक्ष्यीं । गातीं ब्रह्मानंदानें । सृष्टीनें रचिलें गाणें । भाव तयांचे वळखावे । शब्दरूप त्याला द्यावें । तोच कवी ज्या ही क्षमता । मी गणमात्रा वर्तविता । ’ असा अनुवाद केला आहे. परंतु केशवसुतांचा ‘ भृंग ’ हा निव्वळ नादी व गुंगी आहे, तर विनायकांची ‘ चिमणी ’ ही जशी गानी तशी उद्योगीहि आहे. केशवसुतांच्या ‘ कवि आणि कविता ’ किंवा ‘ आम्ही कोण ’ यांत जी एक प्रकारची उद्दाम उद्दंडता आहे तिचा मात्र विनायकांत आढळ होत नाहीं. उलट विनायकांत

**‘ महाकवी थोर नदाप्रमाणें**
**मी बापडा ओघळ. अल्प जाणें**
**धाके न. ओढा झुळझूळ वाहे,**
**माझी तशी ही गुणगूण आहे**

असा मधुर विनय मात्र आहे. विनायकांच्या या काव्यविषयक कवितांत त्यांच्यांतला टीकाकारहि जागा झालेला आहे, आणि त्यानें जागजागीं आपल्या टीकेचे प्रतोद ओढले आहेत. ‘ काव्यें कवीचीं जगतांत गावीं। त्याचें न त्याच्या परि चोज गांवीं। नदी सुदूरस्थ जनां पवित्र। विटाळती तीर्थ तिचेच पुत्र। ’ अशी ते एका ठिकाणीं तक्रार करतात, तर दुसऱ्या एका ठिकाणीं ‘ मत्सर्याचा भरला वारा। अहंपणाचा सर्व पसारा। अज्ञानाची मिरवे द्वाहीं। रसिकत्वाला थारा नाहीं। ’ अशी जगाच्या अरसिकतेवर टीका करतात. त्यांचा स्वच्छंदी व आनंदी पोपटहि अरसिक जगावर पुढीलप्रमाणें टीकेचे आघात करतो :

**‘ मज हाल पुराची काय पाखरा कळे !**
**परि वदती नगरीं अज्ञानच कोंदलें,**
**रसिकता करपली सर्व मत्सरानलें,**
**होईल मुका ऐशा स्थानीं जातां वाचस्पती,**
**पाड तो मज गरिबाचा किती !**

अशाच टकिेचा नमुना आणखी एका ठिकाणीं आहे :

**कृत्रिम हास्य नको जगताचें। असत्य गीत नरस्तवनाचें॥**
**पुर नलगे जेथें खल नाचे। सेवावीं रानें। गाऊं गाण्याचें गाणें।**

केशवसुतांत व विनायकांत राष्ट्रीयता ही बाह्य समान आहे. परंतु विनायकांत ती पराकोटीला पोंचली आहे. केशवसुत पुण्यास विद्यार्थी असतांना ‘ भारतीयाचे उद्गार ’, ‘ गांवीं गेलेल्या मित्राची खोली ’, ‘ दाते यांस ’ अशा पांच सहा राष्ट्रीय कविता त्यांनीं लिहिल्या. पण पुणें सुटल्यावर पुढें त्यांनीं त्या प्रकारच्या कवितांना हात देखील लावला नाहीं हें लक्षांत घेण्याजोगें आहे. उलट राष्ट्रीय कवितालेखन हा तर विनायकांच्या कवित्वाचा विशेष आहे. विनायकांनीं केशवसुतांच्या

सान्निध्यांत चिंतनपर वैणिकें लिहिलीं. त्यांत त्यांनीं केशवसुतांच्या शैलीचें अजाणतां अनुकरण केलें हें खरें आहे. पण वॉल्टेअरच्या 'The good imitation is the most perfect originality' या मताप्रमाणें तें मौलिकच मानलें पाहिजे.

विनायकांच्या गणेशपूजन, महाराष्ट्रलक्ष्मी, शिवसंदेश, हतभागिनी, यापुढें, प्रो. छत्र्यांचा केसरी आदि राष्ट्रीय कविता ओजोगुणविशिष्ट असून त्यांनीं राष्ट्रीय शिक्षण, स्वावलंबन, स्वदेशी व बहिष्कार या चतुःसूत्रीच्या १९०६ ते १९०८ च्या काळांत अख्ख्या महाराष्ट्राला हलवून जागें केलें होतें हा इतिहास विसरून चालणार नाहीं. त्या कवितांत देशप्रेमाचा स्त्रोत अप्रतिहत वाहात असून त्यांचें सामर्थ्य चिरकाल अबाधित आहे. विनायकांच्या राष्ट्रीय कविता शेलेच्या 'Poetry is the record of the best and happiest moments of the best and happiest minds' या कसोटीला किंवा इमर्सनच्या 'The true poem is the poet's mind' या कसोटीला उतरणाऱ्या आहेत. शिवराजदर्शन, शिवसंदेश, यापुढें, महाराष्ट्रलक्ष्मी अशा कांहीं कविता महाराष्ट्रापुरत्या मर्यादित भासल्या तरी त्यांतील देशाभिमानाची प्रचंड लाट साऱ्या भारतावरून उसळण्याइतकी आवेगी व प्रभावी आहे. विनायक हे स्वतःच्या युगाचे प्रातिनिधिक कवि आहेत. त्यांच्या गणेशपूजनांत अकाळविकाळ प्लेगचा निर्देश असून त्याच्या धामधुमींत रँडप्रभृति अरेरावांनीं जो जुलूम व जी जबरदस्ती केली तिचा धिक्कार आहे. १८९७ च्या सुमारास रँड व आयर्स्ट यांचे खून झाले, लोकमान्य टिळक यांना कारावास घडला, चाफेकरबंधूंना फांसावर लटकावें लागलें, या खळबळ माजवणाऱ्या घटनांचा उल्लेख विनायकांनीं पुढील कडव्यांत मोठ्या खुबीनें व सूचकतेनें केला आहे :

**रोगें पीडित नगरें नसतीं योग्य वसायाला**
**अशा प्रसंगीं 'तिलक' लाधणें महत्प्रयासाचें**
**दिसो दिसेल सुनें त्यावेगळ भाल गणेशाचें**
**पुष्प एक वाहून टाकिलें आहे 'चांफ्या'चें**
**दुसरें मिळवावयास जाऊं–करूं उद्यमाला.**

प्रचलित परिस्थितीशीं समरस होण्याचें सामर्थ्य विनायकांप्रमाणें त्यांच्या एकाहि समकालिनांत नव्हतें. विनायक जेव्हां कवितालेखन करीत होते तेव्हां महाराष्ट्रभर टिळकांचा 'केसरी' व परांजप्यांचा 'काळ' यांचा डिंडिम दाजत होता. केसरींतून सनदशीर चळवळीचा पुरस्कार होत होता, तर काळांतून क्रांतीला आवाहन करण्यांत येत होतें. या दोन्ही पत्रांचा विनायकांच्या मनावर विलक्षण असर पडला होता. लोकमान्यांनीं आरंभिलेल्या गणेशोत्सव आणि शिवजयंती या सार्वजनिक उत्सवांत ते जातीनें भाग घेत असत. या उत्सवांतील मेळ्यांसाठीं त्यांनीं पदें लिहिलीं आहेत. मेळ्यांतील एका पदांत 'मातृ-चितेची ज्योत करी' ही कल्पना मांडतांना त्यांनीं लोकमान्यांच्या 'आमची चिता जरी पेटली असली तरी त्यांची विडी ही शिलगलीच पाहिजे' या वाक्याचा संदर्भ दिला आहे. त्यांच्यांतला राजकीय टीकाकार जागरूक होता. प्रसंगविशेषीं स्वजनांवर आणि इंग्रज राज्यकर्त्यांवर त्यानें टीकेचे रसरशीत अंगार पाखडले आहेत. आपण आपली परंपरा व इतिहास विसरलों हें सांगतांना त्यांनीं 'भुललों पूर्व विसरलों सारें। अंगीं भरलें नूतन वारें। मूर्खत्वाचे तुटती तारे' अशी टीका केली आहे, तर लोक फक्त 'उत्सवा' च्या वेळींच जागृत होतात या दोषावर प्रहार करतांना शिवाजीमहाराजांच्या मुखानें पुढील उद्गार वदवले आहेत—

**मी माझी म्हणवीतसें बघवतें आतां न तीं लोचनीं,**
**कां हांका मज मारिते ? न कळतें, वर्षांत एका दिनीं;**
**वीरांनीं पहिल्या स्वभूजननिला जीवंत केलें खरें,**
**आतां प्रेत तिचें चिरीत बसलीं त्यांचीं मुलें लेकरें,**

विनायकांच्या शिवाजीमहाराजांविषयीं तीन चार कविता आहेत. १९०० सालच्या एका मनोरंजनांत (अंक नक्की आठवत नाहीं) 'एडिटरचें टेबल' या सदरांत 'विनायक, धुळें' यांना उद्देशून, 'आपल्या शिवपर आर्या मिळाल्या. पुढें स्तब्ध कां ? विस्मरण नसावें !' असा मजकूर आहे. या आर्याचा छडा लावणें आवश्यक आहे. 'हतभागिनी' ही विनायकांची कविता एके काळीं घरोघरीं लोकप्रिय होती. मनोरंजनाच्या एका अंकाच्या मलपृष्ठावर दुर्दैवी हिंदमाता विलाप करित असून तिचे पुत्र परस्परांत भांडत आहेत असें चित्र होतें. त्यावरून

विनायकांना ही कविता स्फुरली. या कवितेंतसुद्धां त्यांनीं वरील टीकेप्रमाणेंच पुढील टीका आपल्या देशबांधवांवर केली आहे :

**एकाश्रुबिंदु कारणें । तियेच्या रणें । झुंजलें मनें ।**
**असे सुत व्याली । जयकालीं माउली.**
**कारटीं करंटीं तिथें । निपजलीं भुतें । मातृशोणितें—**
**स्वतांला लाली । आणाया धांवलीं !**
**कल्याण काय नेणती । नित्य भांडती । आपसांत तीं,**
**परां वश झालीं- । स्वत्वाला विसरलीं !**
**गेले दिन यावे कसे । वर्तनें असे । एकदां फसे—**
**गाय जी गाळीं । चेपत ती चालली**

ही शेवटली कल्पना विनायकांना चिपळूणकरांच्या 'आमच्या देशाची सद्यःस्थिति' या निबंधावरून सुचली असावी. कारण त्यांत चिपळूणकरांनीं 'प्रजा हाच कीं वत्स भूधेनुकेचा' या श्लोकाच्या आधारें हीच कल्पना मांडली आहे. या कल्पनेवरून व 'यापुढें' या कवितेंतील 'हास्याचे दिन मावळले' या कल्पनेवरून विनायक हे निराशवादी होते कीं काय असें वाटण्याचा संभव आहे. परंतु ते पक्के आशावादी होते. 'शिवसंदेश' या कवितेंत

**स्वातंत्र्यक्षम होय सर्व जनता जाणेल जेव्हां प्रभू**
**तेव्हां वेळ नको स्वतंत्रसुभगा व्हाया महाराष्ट्रभू !**

अशी आशा त्यांनीं व्यक्त केली असून 'महाराष्ट्रलक्ष्मीं'त तर 'पूर्व दिव्य ज्यांचें त्यांना रम्य भावि काळ । रात्र सरे तेव्हां उगवे दिनहि पूर्व वाटे ।' असा सिद्धान्तच काव्यमय करून मांडला आहे. सर्कशींतला सिंह अनेकांनीं पाहिला असेल. पण त्याला पाहून परतंत्र भारताची आठवण फक्त विनायकांनाच झाली. भारताचा केसरी हा प्रो. छत्र्यांच्या केसरीसारखा झाला आहे. तो प्रो. टिळकांच्या केसरीसारखा झाला म्हणजे स्वतंत्र होईल असें वाटल्यावरून विनायकांनीं ही कविता बुद्धयाच 'प्रो. छत्र्यांचा केसरी' या शीर्षकानें टिळकांच्या केसरींत प्रसिद्ध केली. 'फळें मधुर खावया' या सुप्रसिद्ध 'शुकान्योक्तीं'त थोरल्या चिपळूणकरांनीं परतंत्रतेचें दुःख वेशीवर टांगलें आहे. 'बुलबुल्की फिरियाद

## ३२. प्रोफेसर छत्र्यांचा केसरी

[ चाल: अजि अक्रुर हा नेतो... ]

तुज वनराजा काय ग्रहदशा आली ॥ परवशता प्राप्त जहाली ॥
तूं विपिनींचा सार्वभौम अधिकारी ॥ मृगकुलें प्रजा तव सारी ॥
तव आज्ञा ही वेद्वाक्य कांतारीं ॥ तूं राजा थोर विचारी ॥
गर्जना तुझी धैर्या कांपविणारी ॥ चपलेची दृष्टि भरारी ॥

मद्भरें नाग जो नाचे ।
मस्तकीं चढून तयाचे ।
भक्षिसी कवळ मोत्यांचे ।

ऐश्वर्य असें असे तुझें जयकालीं ॥ परि आलें काय कपाळीं ! ॥ १ ॥

दुर्दैव तुझें पडलास कसा रे आतां ॥ कपट्यांच्या निर्दय हाता ॥
ते थाटानें मिरवितात; तव माथां ॥ हाणिती तडातड लाथा ॥
तूं दुबळ्यांच्या साहसी प्रतोदाऽघाता ॥ भीसी श्वासा ! दृक्पाता ! ॥

निःशंकपणें नरनारी ।
करितात तुझ्यावर स्वारी ।
ये अशी तुला लाचारी ।

तव कर्णाची निर्भय धरुनी पाळी ॥ लवविती तुज मुलीबाळी ! ॥ २ ॥

स्थिति रुचे कशी तुज ही लाजिरवाणी ॥ कोठें तव दडलें पाणी ?
जीवंतपणीं स्वत्वाची होतां हानी ॥ प्रेतकळा पावे प्राणी ॥
मृदुलता अशी धरितां लोण्यावाणी ॥ खातील तुला ओठांनीं ॥

समज हे मानवी कावे ।
कुरवाळित घेती चावे ।
मृगजलास या न फसावें ।

ही इष्ट नव्हे परवशतेंत बहाली ॥ नाच रंग दीप्त महालीं ॥ ३ ॥

मनो. फेब्रु. १९०८
पुस्तक १३ वें उत्तरार्ध भाग २ रा
आणि केसरी.



## ३३. चिमा

[ श्लोक : वृत्त : शा. वि. ]

भाग्याचे समयीं मजा उडविली मत्संगतीनें जिनें;
मातें जी न विसंबिली भटकतां पोटार्थ रानेंवनें;
ऐश्वर्यीं व्यसनीं अशी मजसवें जी नांदली सारखी,
हा ! हा ! हारवली चिमा प्रियतमा माझी जिवाची सखी ! १

खालीं मान करून संतत उभी लज्जावती जी असे,
रागेजे न कधीं; सदा मजकडे पाहून गालीं हंसे !
नाहीं सोडुन कोपरा सरकली, माझें सदा आयकी,
हा ! हा ! हारवली चिमा प्रियतमा माझी जिवाची सखी ! २

नाहीं माहित डामडौल अगदीं साधासुधी वागली,
नेसायास दिलें जुनें चिर तरी नाहीं असंतोषली;
ल्याली भूषण एकही न, रिझली सेवून पानें सुकीं,
हा ! हा ! हारवली चिमा प्रियतमा माझी जिवाची सखी ! ३

नाहीं चारजणांसमक्ष तिजला मीं चुंबितां लाजली,
हूं कीं चूं न करी उभी तिज जरी मीं विस्तवें भाजली;
ऐशी भक्ति असे तिची मजवरी ठेवी मला जी सुखी,
हा ! हा ! हारवली चिमा प्रियतमा माझी जिवाची सखी ! ४

मनो. सप्टें. १८९८

## ३४. अवंतिके !

[ चाल : प्रिये पहा ]

प्रिय अवंतिके ! नयनहृदयरंजिके ! ध्रु०

तूं जीवन, तूं भूषण, परमार्थाचें साधन
आहे मज तुजवांचुन, सर्व जग फिके ! प्रिये० १

तूं दैवत, तूं देवी, परमसुखाची ठेवी,
यास्तव तव पद सेवी, सौख्यदायिके ! प्रिये० २

तूं मजला खानपान, तूंच शयन, तूं आसन,
तूं नसतां, सिंहासन नको लाडके ! प्रिय० ३

रूप तुझें दिनरजनीं, वसतें हृदयीं नयनीं,
दिसतें स्वप्नीं, शयनीं, एकसारखें ! प्रिये० ४

रूप तुझें निरखावें, तव वचनामृत प्यावें,
तव गुण गावे, ध्यावे, लालसा सखे ! प्रिये० ५

रात्रीं सरितातीरीं, संसारीं, व्यवहारीं,
तव चरणीं घरदारीं, लागलों निकें ! प्रिये० ६

छंदीं तव मन जडलें, प्रिय तें ज्या आवडलें,
तें मज मार्गीं नडलें, शत्रुसारखें ! प्रिये० ७

मज निंदो निंदी जन, धरिले मीं तुझे चरण,
होवो झालें त्रिभुवन, त्यांत पारखें ! प्रिये० ८



## ३५. चिमणी

[ चाल : धिन्ना धिन्नक धिन्ना धी. ]

रंग गुलाबी गालांचा, दंत हार कुंदफुलांचा
ऐशी सुंदर रम्य परी, प्रेमभरें स्मित मधुर करी. १

चढे रंग गालीं गहिरा, विकसित होती ओष्ठ जरा;
झळकुनि सहज रदनपंक्ती, तिची दुणावे मुखकांती. २

गेली विलयाला रात्र, फुटे तांबडें गगनांत;
कोर निघे रविकिरणाची, सादृशता स्त्रीवदनाची ! ३

जशी स्फूर्तिकन्या कविता, रविता पसरी जागृतता.
घेतीं स्वबलें एक परी, वर्तविती जगता स्वकरीं. ४

उडती बागडती पक्षी, तत्परता ठेउनि भक्ष्यीं;
गाती ब्रह्मानंदानें, सृष्टीनें रचिलें गाणें. ५

भाव तयांचे वळखावे, शब्दरूप त्यांला द्यावें;
तोच कवी ज्या ही क्षमता, मीं गणमात्रा वर्तविता. ६

बेफिकीर साधीभोळी, ओसरींत चिमणी आली;
टिपावया लागे दाणे, गुंगत 'चीं चीं चीं' गाणें. ७

श्रम उदरास्तव करितांना, स्वच्छंदें मारी ताना;
धन्य जिला धरितां आली, व्यवधानें एका कालीं. ८

असें पुण्य गांठीं कोठें ? कुठें भाग्य माझें मोठें !
कीं एके कालीं वाहूं, उदरभार गाणीं गाऊं ९

एक कराया लागावें, दुज्याकडे तों मन धांवें;
साधेना एकही परी, अपूर्णता मनुजता खरी ! १०

स्वच्छंदें गाणीं गातां, पडते उदराची चिंता;
जातां उदराच्या मागें, शब्द दूर पळती रागें ! ११

सहज आरसा एक तिला, बागडतां दृष्टीं पडला;
उडत तयासन्निध गेली, उभी तेथ विस्मित ठेली. १२

ती चंचलता मूर्तिमती, परी तिची कुंठली गती;
स्वप्रतिबिंबित रूपानें, तिची लया नेलीं भानें. १३

भाग आपला ते दाणे, टिपावयाच्या हेतूनें;
आली वाटुनि ही दुसरी, चढे तिच्या संताप शिरीं. १४

मारुनि चोंचीचे घाव करूं सवतिचा पाडाव;
या आवेशें ती भोळी, उडी आरशावर घाली. १५

चोंच दुखावे, रक्त निघे, वेडी परि माघार न घे;
पुनः पुनः आरशावरी, चंचुपुटाचे वार करी. १६

श्रमली, ओशाळली मनीं, आले अश्रु तिच्या नयनीं;
सौम्यपणें दर्पण पाही, बिंब त्याच रूपा लाही. १७

द्वेष ओसरे, प्रेम भरे, वैरी तोचि स्नेहि ठरे !
चुंबी, आलिंगी सखिला, होई तेंच प्राप्त तिला. १८

अजाण तें पांखरूं असे, फसे, यांत आश्चर्य नसे;
आम्ही ज्ञानी, सुज्ञ गडी. तसेचि चुकतों घडीं घडीं ! १९

दिव्य आरसा जगताचा, ईश्वर-निर्मित नवलाचा;
सदैव आम्हांपुढें उभा, दावी सत्य प्रतिबिंबा. २०

हांसूं आम्ही जगा, तसें, करील जग आमुचें हंसें;
करितां जगताची कींव, देइल तें जीवा जीव ! २१

लोभाचें फल लोभ मिळे, द्वेषानें सद्भाव जळे;
जसें गावया पढवावे, तसे बोल गाती रावे. २२

कळून हें आम्हां सगळें, मूढ भाव मतिचा न गळे;
करून जातों भलतेंच, पदोपदीं खातों ठेंच ! २३

## आर्या

गतजन्म प्रतिबिम्बित झाला इह जन्म दर्पणीं स्पष्ट,
केलें तेंच फळाला आलें देखून, सुष्ट वा दुष्ट. २४

यास्तव मना करावा यत्न तुवां सत्पथास लागाया,
गेले जावोत, पुढें दवडावे दिन न आपुले वाया ! २५

मनो. आक्टो. १९०३

पु. ९ भा. ४.



## ३६. प्रीती निमाली तर—

[ श्लोक : वृत्त : शा. वि. ]

नादें मंजुल आपल्या रिझविते जी मन्मना नेहमीं
ती एका निमिषांत रम्य मुरली भंगून टाकीन मी !
अंगातें जडवून पंख उसनें जाईन कीं सत्वर—
मी येथून उडून उंच गगनीं प्रीती निमाली तर ! १

माझी कोण करील उत्सुक मनें मार्गप्रतीक्षा घरीं !
प्रेमें बालक कोण सुंदर वदा देईल माझ्या करीं !
आतां भासतसें मला भवन जें सर्वस्व चेतोहर—
त्या येईल खरोखरीच वनता प्रीती निमाली तर ! २

काव्याला अनुरूपसा विषय तो कोठून राहे जनीं ?
स्फूर्तीच्या उठतील नित्य लहरी कैशा कवीच्या मनीं ?
वाहावीं कवणास काव्यसुमनें त्यानें वदा भूवर ?
कोठूनी जगतीं उरे रसिकता ? प्रीती निमाली तर ! ३

अस्ता जाइल सूर्यतेज वितरी विश्वास जें जीवन,
तेणें व्याप्त समस्त होइल जगत् दुःखांधकारें घन;
सौख्याचा लवलेशही न मनुजा लाभेल हो दुर्धर,
भीतीनें मरतील मानवकुलें, प्रीती निमाली तर ! ४

का. र. जुलै १८९८ आणि
अभिनव काव्यमाला भाग २ रा

# ३७. सुवास

[ ओसाडींत सहल करीत असतां कवीला मधून कस्तुरीसारखा वास येई. ( हा वास जुन्या भुजंगाच्या श्वासाचा असतो म्हणतात. ) वास कसा आला, कोठून आला, म्हणून त्यानें पुष्कळ शोध केला; पण व्यर्थ! त्या नादांत त्याच्या मनाची जी स्थिति झाली, तिचें खालील पद्य हें चित्र होय. ]

हिंडत असतां निर्जन रानीं
स्वैरगतीनें गुंगत गाणीं
मधुर सुवास घ्राणीं आला,
त्या योगानें आत्मा धाला.
उद्भवला हा परिमल कोठें ?
पडलें मजला कोडें मोठें.
फिरलों—स्थिरलों ठायीं ठायीं,
मूळ तयाचें कळलें नाहीं.
कार्य आणि कारण या जगतीं,
तीच वस्तु नटलेली दिसती,
तैसें माझें मानस आतुर.
शंका काढी—देई उत्तर. १

सुगंध जो का अंगीं दाटे,
पुष्पमिषें प्रकटावें त्यातें;
पुष्पें—ज्यांना नाहीं जोड
रंगें, रूपें, वासें, गोड,
हुंगीना परि कोणी त्यातें,
त्यांच्या आस्वादी न रसातें,

खेळावीं जीं रसिका-हातीं,
होते त्यांची संतत माती
ओसाडींतील गुलाबातें
खिन्नपणा याकरितां वाटे.
टाकि उसासे सारा वेळ,
त्याचा हा का गंध असेल ? २

॰ ॰ ॰

वागविली निज हृदयप्रांतीं
भक्तीनें रमणाची मूर्ती,
भजली अर्पण करुनी त्याला
प्रेमाच्या पुष्पांची माला
काय होय तें परि पुरुषाला,
नव पुष्पावरच्या भ्रमराला ?
विमुख तिला तो हाय ! जहाला,
अंतरली स्त्री सर्वस्वाला.
बाला भग्नमनोरथ झाली,
मौक्तिकापरी अश्रू ढाळी.
दुःखानें एकान्तीं स्फुंदे;
काय तेच या स्थानीं गंधे ? ३

॰ ॰ ॰

मात्सर्याचा भरला वारा,
अहंपणाचा सर्व पसारा,
अज्ञानाची मिरवे द्वाही,
रसिकत्वाला थारा नाहीं.

काय अशा जनतेंत रहावें ?
काय पहावें ? काय चहावें ?
बरें राहणें निर्जन रानीं,
ओढ्यासंगें गाणे गाणीं.
यापरि वैतागून कवीनें,
ओसाडींत स्वच्छंदानें—
वाजविला जो सुस्वर पावा,
त्याचा का हा वास असावा ? ४

परिमलकारण कळलें नाहीं,
उगमस्थल आढळलें नाहीं,
व्यर्थ हिंडलों झालों वेडा !
वेडा ! वेडा ! वेडा ! वेडा !
परिमलकारण मजला कळतें,
उगमस्थळ किंवा आढळतें—
सांठवितो कवितेंत तयाला
वाग्देवीला सुखवायाला !
स्वानुभूत वासाचें दान
करावयाला जोंवर ये न
तोंवर कवितालतिकेवरतीं
कर्णिकार सुमनांची भरती ! ५

अभिनव काव्यमाला
भाग २ रा



## ३८. स्त्री आणि पुरुष

[ पद : ला बाई ला, बेलाचें पान ]

फुललिं फुलें— त्यायोगें उपवन खुललें.
दरवळला— परिमल सुखवाया सकला.
स्वैरगती— अलिगण उडती–बागडती.
मधुनादें— गाती प्रभुगुण आनंदें.
मंदगती— स्त्री तेथें हिंडत होती.
विचराया— पुरुषहि आला त्या ठायां.
कौतुकला— हंसला, बाग मनीं ठसला.
नव फुललें— पुष्प एक त्या आवडलें.
प्रेमभरें— खुडिलें तेणें तें स्वकरें.
हुंगियलें— चुंबियलें–माथां धरिलें.
क्षणमात्रें—होय नकोसें तें त्यातें.
कुसकरिलें— फेंकुनि धरणीवर दिधलें.
सर्व कृती— स्त्री ती अवलोकित होती.
गहिंवरली— टिपें तिचीं टपटप गळलीं.
कां तीं? तें— काय कथूं मी रसिकातें!

का. र. मे १८९९ आणि
मनो. आक्टो० १९०२
वर्ष ८ भा. ४.



# ३९. दोन मार्ग

**आर्या** ( गीति )

आयु:पथास फुटले, दिसले मज. दोन वेगळे फांटे,
समजेना मज जावें आपण नि:शंक कोणत्या वाटें. १

एकावर वृक्षांची होती घनदाट पसरली छाया,
होता सडा फुलांचा पडला पांथिक जनास सुखवाया. २

स्फटिकापरी जलाचे होते वाहत तयांत रम्य झरे
ठायीं ठायीं खुलती स्वागतपर राजमंदिरें रुचिरें ३

सुंदर पथशाखा ही ज्या स्थानीं पावली दिसे विलय,
होते चमकत तेथें शब्दत्रय—'सौख्य-संपदा-विजय'. ४

मार्गारंभीं होते थवे जनांचे निघावया जमले,
थोडेच भाग्यशाली परि दिसले शेवटास विश्रमले. ५

ते थोडकेच होते परि सेवित शांतिसुख समाधान,
ते मानी, तेच धनी, त्यांनाच जगांत 'थोर' हा मान. ६

असती कष्ट कसे ते नव्हते माहीत त्यांजला परि ते—
अप्रतिहत अधिकारी—सत्ताधारी तयांस यश वरितें. ७

सत्तेचा, विभवाचा, जगताचा मार्ग एक हाच असे,
आरंभीं एक फलक संबोधी स्पष्ट अक्षरांत असें— ८

ᛘ ᛘ ᛘ

दुसऱ्या पथीं अरेरे! पथ मी त्याला कशावरून म्हणूं
पदही नसें उमटलें, गेलें न कुणी तयावरून जणूं! ९

सर्वत्र खांच–खळगे, पाषाणपरंपराच त्या वाटे
कांटे तिखट विखुरले तिजवर पाहून ज्या हृदय फाटे. १०

आल्या मोडकळीला कुटिका तुरळक कुठें कुठें असती
ओसाड भयाण दिसे नांवालाही न त्या स्थलीं वसती. ११

निंदा दुःख पराजय, दारिद्र्य स्वैर तेथ संचरती
कोण बघून तयांना धजेल टाकावयास पद पुढतीं ? १२

क्षितिजावरी दिसेना कोठें तो कष्टमार्ग शेवटला
असलाच अंत त्याला तर होता तो तमांत गुरफटला. १३

न धजे कुणी क्रमाया पंथ बिकट हा परोपकाराचा
त्याजकडेस वळे जन निंदेच्या पात्र होय तो काचा. १४

हा कीं तो पथ घ्यावा न सुचे, मन गोंधळांत सांपडलें,
'कंटक पथच तुझा हा' श्रवणीं मम बोल तेधवां पडले. १५

ने घे मन, नुचले पद, तरि वळवुनि त्या पथाकडे चरण
रडत कढत धीरानें करावया मार्ग लागलों क्रमण. १६

⚘ ⚘ ⚘

मध्येंच परि पथीं त्या बसलों मी हात लावुनी भाला
बहु निंदिलें स्वतांला विचार हा मन्मनीं कसा आला ? १७

अविचार काय केला ? का या कंटकपथास अनुसरिलें !
दारिद्र्यदुःख दुर्घट जयांत चोहींकडे दिसे भरलें. १८

धिक्कारयुक्त वाणी कानीं मम झणझणूं तदा लागे,
रागे भरे कुणी मज 'बघतोस कसा फिरावया मागें ? १९

पडलास कां विचारीं ? अवघड हा पंथ तुज गमे काय ?
कां हाय हाय करिसी ? येथें कां खिळविले तुवां पाय ? २०

कां टाकिसी उसासे ? कां नयनांतून आसवें गळतीं ?
मूढा भ्याडा पडली ऐसी कैसी तुझी भ्रमांत मती ? ' २१

मृदु बोल मग उमटले ' आली कां दुबळिका तुला बाळ ?
आहेत अनंत जगीं होते ज्यांची सदैव आबाळ. २२

अन्नान्न दशा झाली शिर टेंकाया नसे जया स्थान
निर्वाहास्तव फिरती रिक्तोदर सोडिती परि प्राण. २३

कां त्रासलास ? कंठीं बहुतांचे प्राण दाटले असती
कां करिसी शोक खुळ्या ? भग्नहृदय सर्व येथली वसती. २४

आत्मविचारांत वृथा भ्रमसी, दे दुर्बलांवरी लक्ष.
व्यसनांत गुंतलेले दिसतील तुला धरातलीं लक्ष. २५

दुःखार्तांची भरली आहे एकच जगांत किंकाळी
अश्रुजलें व्यथितांच्या येईल दिसून तुज धरा न्हाली ! २६

बाप मुलांस तुडवितो भाऊ भावावरी उठे रुष्ट
कलह ! कलह ! कलह ! जगीं आप्तपणा सर्व जाहला नष्ट. २७

सत्ता चिर नांदाया विस्ताराया अखंड जे खपती
त्यांसच तुडवून करी मत्ता ती नित्य आपुली प्रगती. २८

सुखसदनांच्या द्वारां सोन्याचे घट्ट बसविले डाग
हव्यासासच उघडीं तीं, अन्याचा नसे तिथें लाग. २९

स्वार्थपरायण अल्पच्च पाषाणापरि करून घट्ट मना,
सर्वापहार करिती, रडवाया लाविती असंख्य जनां. ३०

न्यायाचे क्रयविक्रय बाजारीं धडक चालले उघडे
चोर उदास मिरवितो, निर्दोषी व्यर्थ बंधनांत पडे. ३१

स्वातंत्र्य नामशेष, स्वतंत्र म्हणवून घे स्वतांस बळें
त्यास जड उपाधींचीं जडलीं दृढ बंधनें किती न कळे ! ३२

कोणाच्या देशांवर स्वबलमदें कोण चालवी सत्ता ?
दुबळ्याच्या नम्र शिरीं निर्दय बलवंत हाणिती लत्ता. ३३

नीतीची सत्याची द्रव्याढ्यांनीं करून रांगोळी,
गरिबांकडे सचोटी हांकलिली देउनी करीं झोळी. ३४

असतीं अमरपुरीचीं अनुपम सौख्यें धरातलीं पिकलीं
परि मानवभूतांच्या दुष्कृतिनें भूमिसुरलता सुकली. ३५

‘ दुःखाच्या डोहीं जन सांपडले, लागले बुडूं खोल
आतां तूंच तयाला ’ ऐसे मग धीट उमटले बोल. ३६

‘ आत्मा दिला, दिलें मन परमेशानें जया कळे भेद,
सुखदुःख जया समजे, संस्कारीं ज्यास हर्ष वा खेद. ३७

दुःख पराला झालें, बंधु व्यसनांत गुंतले हाय !
हें समजून जयानें केलें नाहीं तयां कधीं साह्य. ३८

तो नीच, हीन मानवकोटीस कलंक होय जाण, मनीं
तो भार धरेस, तयें कष्टविली व्यर्थ आपली जननी. ३९

अवघड काय पथ गमे अजून झाली न का निरभ्र मती ?
दुःखाच्या भीतीनें आहे त्वां काय रोधिली स्वगतीं ? ४०

दुःखें बहुत चिरडले त्यांजकडे एकवार दे दृष्टि
घे भार तुझ्या स्वशिरीं, होऊं देऊं नंको मना कष्टी. ४१

जो मार्ग तुवा धरिला शेवट त्याचा गड्या मनीं आणी ’
प्रेमभरें मजला ती सुचवूं लागे प्रबोधिनी वाणी. ४२

दृष्टि सहज वर मी जों करुनि पुढें वाट पाहिली माझी
नवलप्रकार दिसला, मति पडली थोर विस्मयामाजीं. ४३

अरुणाची कांति दिसे विराजली व्योममंडलीं दिव्य
सिंहासन सत्याचें त्या स्थानीं स्थापिलें असे भव्य. ४४

‘ लाधेल अंत हा तुज, हें सौख्याचें मिळेल भांडार
जा, जा पुढें, ’ करी ती वाणी मज बोध, ‘ घे न माघार. ४५

लागो, लागेल तुला दुःखांतच सर्व काल कंठावा
नाहीं होणार न हो सौख्याचा एक शब्दही ठावा. ४६

न मिळो न मिळेल तुला या लोकीं कीर्ति-मान आमरण
किंवा न करोत तुझें मरणानंतर जगीं कुणी स्मरण. ४७

कर्तव्यकर्म केलें त्यायोगें होय जें समाधान
तें पारितोषिक तुझें, त्याजपुढें तुच्छ होय धनमान. ४८

जा तर पुढें पुढें मग न श्रम जातील तत्र कधीं फुकट,
स्वातंत्र्यास्तव केली झाली निष्फल न आजवर लगट. ४९

रात्र सरे दिन उगवे, ऋतुक्रमें वृक्षवल्लि पालवती
संस्कृति यथावकाशें फळास येणार त्यापरी जगतीं. ५०

जे कष्ट वाहिले त्वां जगतास्तव सोशिली स्वयें झीज
धीर न सोड तयांचें बाळा होईल शेवटीं चीज. ५१

स्वज्ञाति रक्षिल्याचें, देशा स्वातंत्र्यदान दिधल्याचें,
अंतीं तुझेंचि हें यश, याविण सार्थक न अन्य जन्माचें. ’ ५२



## ४०. नदी आणि कवि

[ श्लोक : वृत्त : उपजाति ]

असो कवीचें कुल अप्रसिद्ध ।
      होई कवीच्या कवनें प्रसिद्ध.
तसा नदीच्या उगमस्थलाला ।
      नदीमुळें गौरवलाभ झाला. १

काव्यें कवींचीं जगतांत गावीं; ।
      त्याचें न त्यांच्या परि चोज गांवीं.
नदी सुदूरस्थ जनां पवित्र ।
      विटाळिती तीर्थ तिचेच पुत्र. २

बाल्यांत उच्छृंखलवृत्ति दोन्ही ।
      ठावा नसे आडथळा म्हणोनी;
लागो दरी खोल, उभा पहाड, ।
      जातात तीं धांवत धाड धाड ! ३

जाई जसें अंतर होत खोल ।
      गांभीर्य ये वृत्ति निवे विलोल.
रेखून मार्ग क्रमितात संथ ।
      करीत कल्याण जगीं अनंत. ४

अभंग त्यांच्या हृदयीं तरंग ।
      निःसंग ते त्यांत सदैव दंग,
गाऊन गाणीं भ्रमतात रानीं; ।
      ते धन्य ज्यांच्या पडतात कानीं. ५

स्वजीवनानें उगवून दाणे, ।
   नदी जिवां दे चिर जीवदानें.
तैसे कवीच्या कविताप्रवाहें !
   जीवांत संजीवन दिव्य लाहे. ६

राष्ट्रें बुडालीं नृप थोर गेले; ।
   नदी कवी मात्र अनंत ठेले !
भागीरथीला खळ लेश नाहीं ।
   अखंड रामायण लोक गाई. ७

महाकवी थोर नदाप्रमाणें; ।
   मी बापडा ओघळ अल्प जाणें.
धाकें न ओढा झुळझूळ वाहे ।
   माझी तशी ही गुणगूण आहे ! ८

का. र. जून १९०५ आणि
अभिनव काव्यमाला भाग २ रा.

## ४१. विरही

**पद ( चाल : कधिं करिती लग्न )**

वद्वेना मला लागे हुरहुर जी तुजमुळें! ध्रु०

चालतों बोलतों घरीं
हांसतों वरी—अंतरीं परी
अश्रु वेल्हाळे! विरहानें तव गळे. १

तव सहवासीं जे दिन
वाटले क्षण, ते युगाहुन
दीर्घतर झाले. नवल असें वर्तलें. २

नाहींस रूपशालिनी
परी गुणखनी, प्रेमरूपिणी
गुणें प्रिय झालें—रूप तुझें सांवळें. ३

तव अकपट प्रेमळ हंसें
अंतरीं ठसे, बोल गोडसे
श्रुतींचीं पाळें, होउनियां बैसले. ४

तव हालचाल लाडकी
आठवुनि सखी, एकसारखी
जड क्षण झाले. कंठितसे प्रेमळे! ५

होईल कधीं दर्शन
दृढालिंगन, प्रेमचुंबन
चिंतनीं डोले—मन घेऊं लागलें. ६

अलि असतो तर बैसुनी
वायुवाहनीं, गात येउनी
तुला वनमाळे ! असतें मीं चुंबिलें. ७

परि दुबळी मानवकुडी
व्यर्थ बापडी, तियेची उडी
बेत केलेले, सर्व कुणा साधले ? ८

का. र. मार्च १९०६



## ४२. स्वप्न

[ कवि प्रवासार्थ निघाला होता. एका पथिकाश्रमांत ( Station ) वेत्रासनावर ( Bench ) निद्रासुखार्थ पडला असतां त्यास एक स्वप्न पडलें. दुसरे दिवशीं हें स्वप्नगीत कवीनें आपल्या प्रियेकडे पाठविलें. ]

**पद** [ **चाल :** नृपममता रामावरती ]

कळवितों तुला प्रेमानें
स्वप्नाचा मम वृत्तान्त—मानिनी ! ॥ ध्रु० ॥

तव मूर्ति मनीं आणोनी
पडलों मी असतां शयनीं—मानिनी ।
तळमळ मम होय जिवाची
येईना निद्रा नयनीं—मानिनी !
क्षणभरी—सहज मज परी—झोंप आदरी बाहुपाशांत;
अनुभवलें स्वप्न तशांत—मानिनी ! १

बसलों मी रंगमहालीं,
सुंदरशा उंच पलंगीं—मानिनी !
पाहिली हात जोडोनी
मजपुढें उभी मृद्वंगी—मानिनी !
तनुवरी—अनेकापरी—भूषणें धरी—हंसे गालांत
प्रेमाचें गाणें गात—मानिनी ! २

घातली उठून जिच्या मीं
कंठांत मिठी स्वकरांनें—मानिनी !
अनुरंजित केलें गालीं
प्रेमगीत तिज ओष्ठानें—मानिनी !

जागृती–नष्ट–दुर्मती–हाय ! शेवटीं–करी कीं घात
काळजी–दुःख–सौख्यांत—मानिनी ! ३

सुंदरी समीप कशाची
स्तंभ उभा जड लोहाचा–मानिनी !
तें प्रेमालिंगन कसलें
जाहला स्पर्श बांकाचा–मानिनी !

ते मुके–वायुचे फिके–एकसारखे डांस कानांत
स्वच्छंदें होते गात–मानिनी ! ४

संसार दिसे सुंदरसा
झांकून चालतां डोळे–मानिनी !
प्रेमाच्या लीला गमती
जागृतींत चेष्टा चाले–मानिनी !

संसृती–जगाची स्थिति–स्वप्नरूप ती–मानुनी सत्य;
चाललों पहा आहोंत–मानिनी ! ५

का. र. एप्रिल १८९९
आणि
मनो. एप्रिल १८९९



## ४३. सृष्टिविवाहमंडप

[ चाल : झाली ज्यांची० ]

अस्तंगत दिनकरकररंजित । मंडप विलसे वर गगनाचा ॥ध्रु०॥

मंजुळ वाणी मंगलाष्टकें । गण आलापी द्विजराजांचा. १

वृक्षशिरावर बैसून करी । गंधवाह वर्षाव फुलांचा. २

लग्नघटी हे अनुरूप स्थल । योग जुळाया युवयुवतीचा. ३



## ४४. समरवर्णन

[ चाल : कर नमितसें ]

भयकर असे प्रभावती रण । रोमांचित तनु करी तत् स्मरण ।
ठायिं ठायिं थय थय थय थय नाचतें मरण. ॥ ध्रु० ॥

मृत्युरूप असिलता तळपती । चंचलेसमान लोटती शर
तड तड तड तड तड तड तड तड वर्षतात घन. १

गर्जतात, करितात शतघ्नी । तप्त-लोहगोलक-विक्षेपण
कड कड कड कड कड कड कड कड फाटतें गगन. २

नाग झुंजती रथ आपटती । शस्त्रघाय लावून वीरवर
धड धड धड धड धड धड धड धड पावती पतन. ३



## ४५. काय वीर तो !

[ चाल : मेंडेरे यार हां ]

काय वीर तो । स्वकुळ मळवि; काय वीर तो !
शस्त्र त्यजी जो रणांत. ॥ध्रु०॥

क्षत्रियबाला जरि अबला मी । त्यजिन कधिं न रणा. १

मोक्षा दवडी गणिल मरण जो । पळविल त्या रण. २



## ४६. कीं तोडिला तरु फुटे आणखी भरानें

[ चाल : यामि हे कामह शरणं ]

परिभवें स्फूर्ति वीरा । द्विगुणित समर साधितां. ॥ ध्रु० ॥

अशुभ चिंती तो । कधिं रणिं भीरु विहरता.
हत समरिंही न बघवेंचि कृष्णवदना. १

वरित यश वीरा । विलसतहि कीर्ति धवला.
परिणयिं सुखें युवति घालि कंठीं माला. २



## ४७. रणावेश

[ चाल : सारि पैसेकी बहार ]

सहर्ष रणविहार । करावया तयार.
अविंधसैन्यभार मी रणीं करीन ठार.
जिवावरी उदार । प्रसन्न खड्गधार.
विजयहार मग कसा मला न लाधणार.
न हें पडेल पार । तरी जिणें असार.
वाहूं राहूं कशास भूमिभार. १



## ४८. प्रीति

[ **चाल :** आवो आवो रंगेला ]

प्रीति खोटी म्हणावी आपलपोटी ॥ ध्रु० ॥

प्रीतिमिषानें स्वार्थ मिरवितो, जगताच्या पाठीं
अमृत ओठीं तयाच्या विष वसे पोटीं १

स्त्रिया भाबड्या जगतीं कपटी पुरुषांची जाती
वर प्रेमी मिळाला धन्य ती मोठी. २



## ४९. अलंकार

[ **चाल :** चन्द्रकान्त राजाची... ]

वस्त्राभरणीं देह नटविणें काय त्यांत सार ?
तनूस शोभा देती केवळ सुगुणालंकार. १

शीलाचें परिधान करावें पातळ जरतारी
कुलस्त्रियेला खुले कंचुकी लज्जेची भारी. २

संतसत्कथाश्रवण डुलावीं श्रवणीं कर्णफुलें
पतिवचनाचीं शिरीं करावीं धारण नित्य फुलें. ३

सत्कृत्याच्या दिव्य कंकणीं करशोभा लाही
परगृहबंधन ह्याच सांखळ्या विलसाव्या पायीं. ४



## ५०. सद्वस्तूची कष्टसाध्यता

[ चाल : मृदु बालवाक्य ]

कस्तूरिका न साध्य होय मृगवधाविना
मधुलाभ होय हांकलून मक्षिका वना ॥ध्रु०॥

अहि दुखवावा त्याचा मणि तेधवां मिळे
शतजीवहानि लाधण्यास एक पोंचळें. १



## ५१. प्रेमलुब्धता

[ चाल : मजवरि तरु ]

पद्मरजा त्यजि न भृंग साहि बंधना
कंटक परि केतकिला। उरग सोडिना. ॥ध्रु०॥

दीपकास दे पतंग। झणिं अलिंगना
प्राण जाय परि कुरंग। लुब्ध गायना
व्यंगबळें प्रेम किमपि। न्यून होइना. १



## ५२. आत्म्याचें मंदिर

[ **चाल** : दिल छीन लियो ]

आहेत दृश्य वस्तु जगीं सर्व नश्वर.
आत्म्याचें केलें त्या म्हणुनि मंदिर.
चिंतोष्णजलें प्रेमें त्या नित्य न्हाणितें.
संतोष उगाळून गंध तिलक लावितें. १

सद्भावरूप सुमनांचा हार अर्पितें.
ओंवाळुनियां प्राण तयावरुनि टाकितें. २

नैवेद्यास्तव तयास देह सादर.
आत्म्याचें केलें त्या म्हणुनि मंदिर. ३



## ५३. विश्वरंगस्थल

[ चाल : फुले सब ऋतुके ]

रंगस्थल रचिलें जगताचें, नरनारी—
भूमिका सजविल्या खेळाया संसारीं. १

राहून दूर परमेश्वर लीलाधारी
अवलोकी पात्रें कशीं खेळतीं सारीं. २

नट नटले केवळ धर्माचे अधिकारी.
फलदाता ईश्वर सर्व समर्थ विचारी. ३



## ५४. दैवदुर्विलास

[ चाल : सार्थांचि ते वदति ]

दैवगती फिरली । साची । धडगत मज न दिसे देशाची. ॥ ध्रु० ॥
झुंजावे जे देशासाठीं । तेचि परांचे झाले साथी
सांपडलों मी वैऱ्याहातीं । कशी सफलता होय जिण्याची. १



## ५५. देशभक्ताचा अपूर्व सोहाळा

[ दिंडी ]

देशभक्ता प्रासाद बंदिशाला
शृंखलांच्या गुंफिल्या पुष्पमाला.
चिता सिंहासन शूल राजदंड
मृत्यु दैवत दे अमरता उदंड. १



## ५६. कष्टाकुल राजपद

[ चाल : हो जानत ]

तिळभर राजपदीं सुख नाहीं
झुंजावें मृत्युमुखांत शिरावें तेव्हां तें करिं येई. ॥ ध्रु० ॥
संरक्षणही असे तयाचें भरलें विघ्नशतांहीं ।
सदा तयाच्या भाविस्थितिची चिंता नृपमन दाही. १



## ५७. प्रजाहृदय हेंच राजपद

[ राग : बेहाग—दादरा ]

हृदय खरें स्वप्रजेचें भूपाचें पद असे ॥ ध्रु० ॥
परचक्राच्या वादळें । न तें डळमळे ।
दुणावें बळ । प्रजासंतोषें, अढळपदीं नृप बसे. १
उलटली प्रजा ज्यावरी । स्वपद तो धरी ।
वालुकेवरी । स्थैर्य त्या कैसें, जलवेगें जें धसे. २



## ५८. काळाची प्रतिकूलता

[ चाल : झाले बहु दिन ]

मनुजा प्रतिकूल असे काल जोंवरी।
स्कंधावर मिरवावा तोंवरी अरी। शांत अंतरीं. १
रुष्ट दैव सुप्रसन्न जाहल्यावरी।
तुडवावा चरणांनीं तोच भूवरी। मृद्‌घटापरी. २



## ५९. समाधानमहति

[ चाल : लक्ष्मीसम चंचल ]

ज्यास समाधान-कल्पवृक्ष लाधला,
भूवरती काय उणें होय त्याजला ? ॥ ध्रु० ॥

संकट त्या उत्सवसें। कोपीं अनुराग दिसे
भरलीं सर्वत्र कुसें। शेज फुलांची विलसे
कारागृह हीन असे। राजमंदिरासरसें
गमती जणुं कुसुमहार। लोहशृंखला ! १



## ६०. देशभक्ताचें सामर्थ्य

[ चाल : सुनो प्यारी प्यारी ]

एक देशाभिमानी । महा शत्रुसेनेस भारी
पादचारी असो वा नसो बापुडा शस्त्रधारी. ॥ध्रु०॥

देश गेलाचि जावो परांच्या करीं । नष्ट झाला म्हणावा न तो तोंवरी
एक स्वजनाभिमानी वसे जोंवरी । रविकरसम अंधारीं
तोचि जागी करील प्रजा गाढ निद्रिस्त सारी । पादचारी० १

## ६१. वैभवाची चंचलता

[ चाल : माधवा भगिनी ]

वैभवें नटल्या जयाच्या सौख्यशाला विशाला—
काय ही यावी कपाळीं बंदिशाला अशाला ? ॥ध्रु०॥

सुमन—शयनीं शयन ज्यानें करावें सुखें त्या—
भूमिशय्या भुज उशाला वायु शालादुशाला. १

दैव हें त्यापुढें न चले पाड मानवाचा,
आक्रमी सत्ता तयाची स्वैर दाही दिशांला. २



## ६२. आयुष्य विषाचा प्याला

[ **चाल** : किती कपटी ]

आयुष्य विषाचा प्याला । आशेनें गोडी त्याला. ॥ध्रु०॥

सिंह-व्याघ्र-वृकीं वनवासीं । विराटसदनीं खल-सहवासीं
पांडवजाया राजविलासी । आशेवरि कंठी काला. १

सोडवून असुरांचा विळखा । भेटेल पुन्हां मज रामसखा
या आशेवर जनककन्यका । सहन करी विरहज्वाला. २



## ६३. खरें क्षत्रियब्रीद

[ चाल : प्रतिकूल होईल ]

धर्मरक्षणाचें आहे व्रत क्षत्रियांना
आजवरी असंख्यांनीं दिल्या त्यास माना ! ॥ध्रु०॥

स्वप्रियेची कंठीं पडली मिठी सोडवून,
उत्तरिया झोंबे तान्हें दूर तें करून,
गृहधनादि ऐश्वर्यातें पार झुगारून,
सिद्ध असति समरीं जाया पात्र तेंचि माना. १



## ६४. भोगभुक्ति

[ **चाल :** तात तुझा तनया ]

भोग कुणा सुटले जगीं या ॥ध्रु०॥

भोग भोगिले बरवें झालें । ऋण त्यांचें फिटलें
श्रीरामानें वनवासाला । काय नको म्हटलें ? १

हय खाजविता कृष्णाचे कर । काय कधीं विटले ?
धैर्यें पांडव दिवस कंठिती । व्यसनीं गुरफटले. २



## ६५. मातृभक्तीचें लेणें

[ **चाल :** बायांनों या सोडोनी ]

मातृभक्ति गाजविली त्वां धन्य धन्य जगतीं बाळ ! ॥धरु०॥

नवमास भार वाहुनी प्रसवलें अनेक सुतां मी
खेळविलें वाढविलें त्या ठेविलें सुखाच्या धामीं
आशा मज वृद्धपणीं ते येतील आपुल्या कामीं
परि अतां प्रत्यया आलें
वांझच मी कां न रहालें
व्यर्थ अशा तनया व्यालें
झाले जे गाता काळ ! मातृ० १

झोंबली असे हृदयाला माझ्या परवशताव्याली
चाललें करांच्या भारें संतत मी खालीं खालीं
आशा मज जीवित्वाची होती ती सर्व निमाली
मज काळमुखीं द्यायाला
सजले रिपु त्या समयाला
कळवळा तुला मम आला
झटलास बाळ बहुसाल. मातृ० २

परि जनहित राजहिताचा लागला लढा असल्यानें
अन्याया न्यायच गणती सत्य बुडे खोटें नाणें
बंडखोर म्हणती त्याला जो चाले सत्यपथानें
देशभक्ति ज्याचे ठायीं
ठरतो तो राजद्रोही
यास्तव तव पडली पायीं
जड लोहशृंखला काल ! मातृ० ३

न दिसे जरि आज फळाला आलेलें त्वत्सत्कृत्य
रुजविलें मातृभक्तीचें बीज तयें सद्हृदयांत
उपजवील जनतेमध्यें तें नवा जोम सामर्थ्य
मग सत्य न्यायासाठीं
होईल लढाई मोठी
जिंकून मंडळी खोटी
सत्य तुम्ही जय पावाल. मातृ० ४

प्राणिमात्र कैदी बनले विश्वरूपकारागारीं
चौऱ्यांशीं लक्ष कड्यांची खिळलि पदा बेडी भारी
बंधमात्र त्याचा तुटतो जो षड्रिपूस संहारा
हा ज्ञानविचार मनांत
वागवितां बंदिगृहांत
होईल तुला निर्भ्रांत
सुख–समाधान चिरकाल. मातृ० ५



## ६६. जन्मसार्थक्य

**पद** [ **चाल :** रामकरीं जरि ]

नेउनिया स्वातंत्र्य लयाला
चढले जे वैभव–शिखराला
नको–नको पाहणें कपाळा–जयस्तंभ त्यांचें. १

स्वदेशभक्तांच्या नांवानें
सजलीं कारागृहें, श्मशानें
अवलोकन करणें नयनानें–सार्थक जन्माचें. २



## ६७. दंत आणि जिव्हा

( सुभाषित–हिंदीवरून )

श्लोक [ वृत्त : शा. वि. ]

**दंत** : जिव्हे, तूं मृदु, कोंवळी, दृढ गडी बत्तीस आम्ही बळी.
गोष्टी लांब करूं नकोस, तुजला खाऊन टाकूं पळीं.

**जिव्हा** : प्रौढी व्यर्थ कशास हीं मिरवितां ? मी बापडी एकली.
बोलें एकच लोळवीन अवघे बत्तीसही भूतलीं. १



## ६८. प्रत—

**श्लोक** [ वृत्त : शा. वि. ]

मी हट्टी, मजहूनही अधिक तूं आहेस हट्टी खरी.
केला हट्ट तुवांच, दोष मजला कां लाविशी तूं तरी ?
राहूनी पतिसंगमीं सुख जसें, तें कां वियोगीं असें ?
नाहीं भ्रांति तुझी अजून फिटली, त्याला करूं मी कसें ? १

दुर्दैवें जडलें मला व्यसन जें, तें साहवेना तुला.
होतें दुःसह, तापदायक, तरी हा मार्ग कां चांगला ?
जन्माचा–निधनें तुटेल न असा–संबंध जो जोडला,
घ्यावा गोड करून ह्यांतच भलें हें कां कळेना तुला ? २



## ६९. प्रासंगिक स्फुट पद्यें

– १ –

श्लोक [ वृत्त : द्रुतविलंबित ]

उगवलें हिरवें तृण साजिरें
क्रमण गीतभरें करिती झरे
पवन पुष्पसुगंधित वाहती
तरु तया लहरीवर डोलती. १
कुसुमयुक्त तरूवर बैसुन
मधुरसें करिती खग गायन
दशदिशा रव मंजुल कोंदला
कवण त्या भुलला न वनस्थला ? २

• • •

– २ –

आर्या ( गीति )

चित्त स्थीर असूं दे, व्हायाचें व्हावयाविना न टिके,
टाळाया त कोणी यत्न करो, ठरति सर्व ते लटिकें. १

• • •

– ३ –

पद [ चाल : मजवरि तरु... ]

धर्म असे जगताची वंद्य माउली,
मनुजावर करि तो सुरवृक्ष–साउली. ध्रु०
परलोकप्राप्तीचें द्वार मोकळें,
त्रस्त जिवा विश्रांतिस्थान लाभलें,
राजमार्ग दावाया राम–पाउलें,
हृदयसरीं ज्ञानाची विकसली कळी ! धर्म० १

धर्मास्तव गृहदारा तुच्छ लेखिलीं,

* * *

समयीं स्वप्राण दिले—अर्पिले बळी,
धन्य धन्य धन्य तीच वीर—मंडळी ! धर्म० २

● ● ●

—४—

पद ( चाल : पंचकल्याणी घोडा अबलख )

कोणी बालक अंकावरी । घेई जो जो जो त्या करी
आलापी मंजुळ रवें—गायना हर्षे
ती गानमिषें त्यावरी सुधेतें वर्षे. ध्रु०
कोणी बालक घेई कडे । जावळ ज्याचें भुर भुर उडे
बोबडे बोबडे वदे—अकारण हांसे
पाहतां त्यापुढें तुच्छ स्वर्गसुख भासे. १

● ● ●

—५—

जो निजद्रोह वरी,
दरबारिं आपुल्या तयाचा राजा गौरव थोर करी.
स्वबांधवांचे गळे नृपास्तव—
कापिती, जे नीचमती,
त्यांना बढती—मिळते जगतीं—
उन्नतिपथ दिसण्यातें साधन,
*मातृ—चितेची ज्योत करी ! जो० १

● ● ●

*Cf. लोकमान्य म्हणतात, ‘ आमची चिता जरी पेटली असली तरी त्यांची विडी ही शिलगलीच पाहिजे ! ’

— ६ —

न हे दिन सौख्य विलासाचे । शिरावर परवशता नाचे ! ॥ ध्रु० ॥
घेरितां सदन ज्वालांनीं । आठवे कशी मेजवानी ?
अवस्था होय दीनवाणी । उठा हो उठा तरी कोणी !
पावलें स्वत्व विनाशाला
सांपडे स्थान आळसाला
घाली दरिद्रता घाला
कराया हनन तिचें, सुखसदन—
मिळाया, चरण धरा हो धरा उद्यमाचें ! शिरावर० १

● ● ●

— ७ —

आर्य माउली नष्ट दशा ही
कशी बये तुजला आली ?
ऐश्वर्य लया गेलें, झाली —
मान–धनाची रांगोळी !
जे सत्त्वधीर ज्यांहीं नाहीं लवविली मान–
राखायाला मान दिधले ज्यांनीं प्राण–
परद्वारीं बसले आतां होऊन ते श्वान ! १

● ● ●

— ८ —

सुत खरे जयांची आहे—
तव पदीं माउली भक्ती;
लागती अश्रु ढाळावे—
तुजसाठीं त्या एकान्तीं;

कठिण काळ आला पाहीं
देशभक्ति ज्याचे ठायीं
ठरतो तो राज-द्रोही
स्वाऽवना-कराया रणा-जाय त्या जना
भूपती लोटी-मृत्युमुखीं ही नयनीती. सुत० १

• • •

—९—

पुरे करा बहार—उठोनि व्हा तयार.
विनष्टपारतंत्र्यजीवितांत काय सार ?
परी अनीतिभार—
करावयास पार—
नकोच चालवावया रणांत खड्गधार !
तो सर्व कारभार—
करावयास, फार—
आहे, आहे—लेखणी हुशार. १

• • •

—१०—

**पद [ चाल : दों दिवसाची...... ]**

एकी गेली स्वार्थपरायणवर्तन भरलें चोंहिकडे,
त्या योगानें स्वतंत्रतेचे देशाच्या झाले तुकडे !
अन्नाचें भांडार संपलें हातीं भिक्षापात्र पडे,
लोभ माजला परस्परांचें धरावया भजलों नरडें !
देश बुडे सर्वस्व बुडे परि नेत्र आमुचा ना उघडे ! १

• • •

— ११ —

**पद [ चाल : हे स्वतंत्रते ! ]**

न्यायदेवते । सुजननुतशुचिव्रते ! ध्रु०

तव राज्यीं नीच दुष्ट
मारितात मजा नित्य
भोगितात साधुसंत—हाल संकटें ! १

न्यायें जे धनी साव
त्यास रहाया न ठाव
बसले होऊन राव—चोर भामटे ! २

पर–गुण–गायन भूषण
परसेवन–हितसाधन
उरलें परहित–चिंतन–काम काय तें ! ३

पडलीं सर्वस्व कुसें
भरला अंधार असे
पायवाटही न दिसे–गतिच खुंटते ! ४

× ×
*
× ×

घरच्यांना न्यायपथ–क्रमण जाचतें ! ७

दीन लेंकरा आई !
सुचवी युक्ती कांहीं
जेणें पडली पायीं–शृंखला तुटे ! ८

● ● ●

---

* या पदाच्या या दोन ओळी व ५ व ६ हीं दोन कडवीं उपलब्ध नाहींत !

-१२-

**पद [ चाल :** राम स्मरावा राम **]**

जन्म सफलता यांत-नराची । जन्म०
जन्मभूमि ही मातृदेवता,
स्वधर्म अपुला तात—
संरक्षावें निशिदिनिं त्यांतें,
शिर घेऊन करांत ! जन्म० १
श्रेयस्कर झाला निजधर्मी,
सर्वस्वाचा घात—
इंद्रपदास्तवही न धरावा,
परधर्माचा हात ! जन्म० २

• • •

-१३-

**[ चाल :** जीं जीं कार्यें त्या योग्याच्या **]**

स्वातंत्र्यास्तव कोण प्राणी सिद्ध न मरणाला ?
धिक्कार असो परवशतेच्या हीन जीविताला !
आर्यभूमि घायाळ जाहली रक्तानें न्हाली—
उठा करा संरक्षण-जन हो तिचें यथाकालीं.
पारतंत्र्यशृंखला वाजते पायीं खळखळ ते-
कर्कश रव नायकवे तीचा हृदय विद्ध होतें !
अन्नाची रुचि हरी जल पितां जालिम विष गमतें;
नको नको ही स्थिती बहु बरें मरण तयापरतें !
पुत्र खरा जो होय संकटीं जननीचा वाली-
सर त्याची येई न अरीच्या अगणित सैन्याला ! १

• • •



वि. क....१२

—१४—

परतंत्रपणें जगतीं फिरणें
त्याहून बरें मरणें !
अति दीनपणें अरितें नमणें;
त्याहून बरें मरणें !
न धराल जरी तरवार करीं,
चिरडील अरी समरीं;
अधमाधमशा पावाल दशा,
बकरीच जगीं दुसरी ! १



## ७०. श्रीशिवगीतें

– १ –

[ **चाल :** सुस्वर सुरुचिर कवन ]

शिवगायन गाऊं सप्रेम मानसें–
परवशतामुक्तीचा हाच पथ दिसे. ध्रु०

आर्यावर्तांत यवन जाहले बळी
देती यमराजमुखीं गोद्विजां बळी
हिंदु–मंदिर अनेक मिळविलीं धुळी
मशिदी उभवून दिल्या मंदिर–स्थळीं
हिंदुधर्म-नाशाची वेळ पातली
दग्धहृदय होतील न हिंदु मग कसे ? १

आळविला दीनांचा नाथ त्या जनीं
भरतें त्या करुणेचें लोटलें मनीं
अंगें तो सिद्ध होय दीनरक्षणीं
अवतरला शिवरूपें देव या जनीं
रंगावें मनुजें तत्कीर्तिगायनीं
तेणें देशाभिमान–तेणें धर्माभिमान–मानसीं ठसे ! २

शिवरायें समरीं यवनास मर्दिलें
देशाच्यापायीं सर्वस्व वाहिलें
स्वजनांच्या विघ्नसंकटास वारिलें
देशातें धर्मातें फार सुख दिलें
देशास्तव निज सौख्या तुच्छ लेखिलें
कष्टार्जित राजपदीं भूप मग बसे ! ३

घोर युद्ध झालें कल्याणसंगरीं
सांपडली यवनाची कन्यका करीं
जीच्या रूपास नसे जोड भूवरी
न धरी अभिलाष तिचा भूप अंतरीं
परनारी जननीसम गौरवी परी
भूलोकीं ऐसा जन कोणता असे ?

• • •

— २ —

[ चाल : ब्यांडची ]

श्रीशिवसम नरवर खडतर व्रतधर
विरळा जगतीं या !
कुजन-यवन-छलन,-हनन चरण—
कमल—शरण—व्यसन हरण करावया
शिवरूपें सुरवर कीं,
अवतरला भूलोकीं,
जया दया
तद्गुण—गायन मोचन—साधन
परवशतेच्या डोहीं ज्याला सीमा नाहीं-तरावया श्री. १

## ७१. मेळ्याचीं पदें

–१–

[ चाल : " हा हारे मोरा लचक लचक " ]

करितों मी अर्पण तव कवनसुमनमाला चरणाला. ध्रु०

शक्तिहीन दीन लीन तव चरणीं दास,
गणनायक ! यशदायक होइं पामराला. १
भ्रमले विस्मरले जन तव तुज भजनास
कविवचनें लाव तया सत्पथा दयाळा ! २

• • •

–२–

[ चाल : नमूं सुव्रत भगवान् ]

तार अम्हांला तार; गणेशा !
तार अम्हांला तार !
निज कृपाछत्र विस्तार—गणेशा० ध्रु०

स्वतंत्रता भूषण जन्माचें—
दुर्दैवानें आम्ही तिजला अंतरलों,
परवशतेच्या डोहामाजीं सांपडलों,
परकीयांचे भारी भारानें खचलों,
निःसार गमे संसार ! गणेशा० !

• • •

— ३ —

पद [ चाल : ओ जानत प्रीतरीत ]

ते मंगल-धाम-नाम वद वाचे
पापातें, तापातें, शापातें
हरितें स्मरण जयाचें-तें०
पूजन अर्चन गणरायाचें—
सौख्य वृद्धिकर साचें;
भावें भजतां हेरंबातें—
लक्ष्मी सदनीं नाचे ! तें० १

• • •

— ४ —

[ चाल : आलें मला आतां अवसान. ]

दृढ भक्ति सुधेची खाण—
भक्तिमान्—हो न वाण—
भगवान्—घरा आण—दृढ भक्ति० ध्रु०
भक्ति ज्याची हेरंबाचे पायीं पायीं पायीं,
न्यून त्याला या जगांत कांहीं नाहीं नाहीं नाहीं;
त्याच्या आज्ञेतें प्रमाण, भूतें मानितात जाण
भक्तिमान् हो. न वाण. भगवान् घरा आण;
दृढ भक्ति सुधेची खाण—! १

• • •

— ५ —

तव चरणीं मन जडे गजानन !
तुजविण दुसरें न तया चिंतन ध्रु०
संसृतिसागर तरावयातें,
एक तुझें गुणगायन साधन;
तव पदकमलीं स्थिरले तरले;
मीच कसा उरलों पापी जन ? १

• • •

— ६ —

क्षणभर नसे मनास विसावा
गणवर ! धीर कितीक धरावा ?
संसाराच्या तापें शिणलों—
उद्धारा मज दीनदयाळा !
ठाव मला निज चरणीं द्यावा ! १
हे करुणाकर दीन जनोद्धर !
दासाचा या अतां कृपाळा—
अंत वृथा न पहावा ! २

• • •

— ७ —

गणवरा षडरिकंदना !
संसृतिपाशीं फसलों, विस्मरलों—
देवा—तव चरणा—अघदहना—सुखसदना ! गण०
संसारीं या सार नसे—दुःख वसे—सौख्यमिषें
दे दे चरणीं थारा मजला तार दीनोद्धार !
जगदाधार यश विस्तार—तार तार तार ! गण० १

• • •

-८-

[ चाल : स्फटिकांचे ते पद्पथ ]

इष्ट मित्र कन्या सुत जाया । द्रव्याची केवळ पडछाया ।
यौवन हें जाईल लयाला । अतिशय दुर्बल मानव-काया.
मृगजल हें भ्रमबुद्बुद केवल । कां भुललास तयाला वायां ?
व्यर्थ पसारा आहे सारा । भज भज भज मनुजा गणराया. १

● ● ●

-९-

पद [ चाल : या हो सज्जन... ]

माया-मला भ्रमविते वायां
दयाकरा तुजवीण कोण मज अन्य क्षम ताराया ?
छाया स्वकृपेची गणराया
दीन लीन या दासावर कर पोटीं घे अन्याया.
पाया अर्पण केली काया
ध्यान तुझें मानसा लागलें अन्य सुचे न जना या ! १

● ● ●

-१०-

पद ( चाल : श्रीरामिं मना रत होईं )

आसरा नरा-गणराय खरा ध्रु०
सद्भावानें विघ्नहराचे-
पाय धरा त्या साध्य करा
भवसिंधु तरा-हा मार्ग बरा
भक्तिबळें वश होय गजानन
भक्ति वरा जी सुलभ-तरा
घ्या स्वर्ग पुरा आणून घरा ! आसरा० १

## ७२. गोरक्षणपर पदें

— १ —

तुम्हां तो देवो सौख्य हरी !
आवडीनें गोपवेषें स्वतनु मंडित जो करी–तुम्हां० ध्रु०
मंजु मुरली वाजवी जो गोकुलांचें मन हरी
वेणुनादें जणूं हर्षें अमृत वर्षे त्यावरी;
वंशयष्टी घे करीं जो कृष्ण कंबल पांघरी
धेनु–सेवा करी अंगें लताकुंजाभीतरी;
दर्भ चारी नीर पाजी पाडसातें जो करीं. तुम्हां० १

• • •

— २ —

धेनूचा प्रतिपाळ-करा हो धेनूचा प्रतिपाळ ध्रु०
धेनु जगाची मातृदेवता वृषभ तियेचें बाळ. १
वृषभ धनी शेतीचे तीची त्यांवांचून आबाळ. २
गरिब धुळीस मिळाले–झाले भाग्यवंत कंगाल ! ३

• • •

— ३ —

सत्पुत्र हे नाम देती जगीं त्यास
देवापरी मातृसेवा करीं अन्य चित्तांतरीं
जो धरीना कधीं ध्यास ! ! सत्पुत्र०
मानोनिया गाय ही आपुली माय
देतां तिचा काय कैसा कसायास ! ! सत्पुत्र० १

• • •

—४—

दिसेना आज गोमाते जगीं कोणी तुला वाली !
बसोनी घाव रक्तानें तुझी काया बये न्हाली !
तुझ्यासाठीं रणीं ज्यांनीं दिल्या प्राणाहुती मातें—
कुळें त्या आर्यवीरांचीं गमे गेलीं विनाशातें ! ॥ १ ॥

• • •

—५—

मनुज धेनूस जो रक्षी जसा स्वप्राण—
तयाचे नित्यशा होवो जगीं कल्याण !
नसो त्या वाण—मिळो सन्मान—धनाचीं खाण
समस्तांच्या मुखीं खेळो, विनायकगान* ॥ १ ॥

* कित्येकांचे तोंडीं ' कवींचें गान ' असाहि पाठभेद आहे.

# परिशिष्ट अ

## हिरकणी

[प्रस्तुत पुस्तकाच्या २१ व्या पृष्ठावर विनायकाची 'हिरकर्णी' ही अपूर्ण कविता छापली आहे. ही कविता कवीचे पुतणे रा. रा. ना. वि. करंदीकर यांनीं यथामति पूर्ण केली आहे. रा. नारायणरावजींचा काव्य-लेखनाचा हा प्रथमच प्रयत्न असल्याकारणानें ती वठावी तशी वठली नाहीं. असें असतांहि ती परिशिष्टरूपानें प्रस्तुत पुस्तकास जोडिली आहे. हेतु इतकाच कीं, वाचकांना हिरकणीची गोष्ट थोडक्यांत कळावी.]

[ वृत्त : दिंडी ]

गोपनारी हिरकणी गडा गेली—
दूध घालाया; परत झणिं निघाली;
पायथ्याशीं तें वसे तिचें गांव,
घरीं जाया मन घेइ फार धांव. ७

घरीं तान्हें तें ठेवियलें होतें,
तया घ्याया उत्कंठ बहुत हो ते;
म्हणुनि उचली ती झपझपां पदातें,
परी दुर्दैवें उशिर होय तीतें ! ८

शिवप्रभुचा निर्बंध एक होता,
तोफ व्हावी अस्तास सूर्य जातां;
सर्व दरवाजे बंद अचुक व्हावे,
कुठें कोणां जाऊं न येउं द्यावें ! ९

येइ काकुळती हिरकणी बिचारी,
अश्रु बालास्तव रडुनि ढाळि भारी;
जरी सैनिकमन विरघळे दयेनें,
कोण राजाज्ञाभंग करूं जाणे ? १०

सर्व दरवाजे फिरुनि परत आली,
तिला भेटेना तेथ कुणी वाली !
“ कोण पाजिल तरि तान्हुल्यास आतां ”
विचारें या बहु दुःख होय चित्ता. ११

कोण घालिल घुटि भरुनि टाळु चोजी ?
कोण अंगाई करिल त्यासि आजीं ?
कोण बाई बैसेल पाळण्याशीं,
जरी नाहीं मी तेथ त्याजपाशीं. १२

खिन्न होई या करुनि विचारांना,
मनीं प्रार्थी गोपाळ गोपराणा !
वदे ‘ जाया सामर्थ्य मला देई,
करीं धरुनी भगिनींस घरीं नेई. ’ १३

दयासागर हरि त्यास आठवून,
हृदयवांच्छित पावे न कोण दीन ?
मातृहृदयाला आडवून राही,
असें संकटही कोणतेंच नाहीं ! १४

मार्ग सुचला आनंद फार झाला,
निघे वेगें मग घरीं जावयाला;
नसे रक्षक यद्रक्षणार्थ ऐसा.
एक होता पथ रायगडीं खासा ! १५

भला तुटलेला कडा उंच नीट,
तळीं जाया उतरती पाय वाट;
पाय चुकतां निश्चिंत मृत्यु येई,
परी माता ती तेथुनीच जाई ! १६

उतरूं लागे मन घरीं वेधलेलें,
शुद्ध नाहीं जरि तनुस लागलेलें;
अंग खरचटलें वस्त्र फाटलेलें,
अशा वेषीं ती घराप्रती चाले ! १७

घट्ट पोटाशीं धरुनि बालकातें,
चुंबनांनीं संत्रस्त करी त्यातें,
हर्ष झाला विसरली संकटातें,
करी साहस माता न कोणतें तें ? १८

वृत्त घडलें शिवभूपकाणीं जातां,
वदे आनंदें 'धन्य धन्य माता !'
कड्यावरतीं त्या बुरुज बांधियेला,
नांव दिधलें 'हिरकणी बुरुज' त्याला. १९



# परिशिष्ट ब

[ या परिशिष्टांत पूर्वीच्या तिन्ही आवृत्तींत संकलित न झालेल्या विनायकांच्या कविता दिल्या आहेत. ]

## ७३. जीवितमहिमा*

श्लोक [ वृत्त : शा. वि. ]

'आहे जीवित भासमात्र'-रड ही गाऊं नका हो ! नका.
झोंपा घेत असे मनुष्य, मृतवत् लेखूं नये त्यास कां ?
बाहेरून दिसे तशीच नसते वस्तुस्थिती दुःखदा.
'आहे जीवित तथ्यपूर्ण'-हृदयीं ही गांठ बांधा सदा. ॥ १ ॥

'जाऊनी पडलों चितेंत म्हणजे केलें खऱ्या सार्थका,
आम्हीं मेळविली'—असें न समजा—'आहेस तूं मृत्तिका
मातीला मिळशील'—सद्वचन हें आत्म्यास लागूं नसे.
भोगावे सुखदुःख केवळ, न हा संसार हेतू असे. ॥ २ ॥

आहे जी स्थिति आज तीहुनि उद्यां कांहीं करावी बरी
विद्या विस्तृत, वेळ अल्प अगदीं, तैशांत ती धांवरी !
छाती थोर, तथापि, नित्य सुचवी प्रत्येक ठोका जना
आला मृत्यु समीप—सावध असा—कां चालवा यत्न ना ? ॥ ३ ॥

आहे जीवितयुद्ध विश्वसमरीं मोठें सदा चाललें;
धीरें त्यांत लढून, नांव जगतीं ह्या गाजवा चांगलें;
गोते खाल, न चालवा—विनवितों—त्या मेंढरांचें व्रत.
गेल्याचाच करीत शोक बसणें वाईट ही पद्धत. ॥ ४ ॥

---

*कवि विनायककृत सत्कार्योत्तेजक सभेच्या स्थापनेचें अष्टक.

सत्कार्योत्तेजक मंडळी—धुळें.

भावी काळ कितीहि सौख्यद असो, जाऊं नका त्यावर
आहे ही घडि आपली—न गमवा. यत्नास व्हा सादर.
चित्तीं धैर्य धरा. सदा भरंवसा ठेवा हरीच्या वरी
संसाराब्धि तरावयास तरणी ही एक आहे खरी. ॥ ५ ॥

झाले आजवरी महापुरुष जे त्यांचीं चरित्रें पहा.
'व्हावें आपणही तयांसम'—तुम्हा लाभेल हो ! बोध हा
जातांना जग सोडुनी, उमटवा मागें पदें आपुलीं—
काळाच्या पुलिनीं. जनास सरणी घालून द्या चांगली. ॥ ६ ॥

संसाराब्धि तरून जात असतां, जो सापडे एकटा,
फेरे घेत फिरे, बळी जन पडे जो बापडा संकटां,
जीवाशा नुरली—अशास दिसतां तीं पावलें आपलीं
मित्रांनो, न गमेल काय 'मजला संजीवनी लाधली ?' ॥ ७ ॥

यासाठीं, कर जोडुनी बसुं नका—बांधा कशी कंबर.
घाला भीक न संकटां—प्रतिदिनिं यत्नास व्हा सादर.
भाषा प्राकृत उन्नतीस चढवा-काया करा अर्पण
आर्यावर्तहितास. द्या सतत सत्कार्यास उत्तेजन. ॥ ८ ॥

रामदास रामदासी
भाग ५०, सर ५, मणी ६
१९ माहे मे १८९३



## ७४. कवि

पद [ चाल : साम्य नसे मुनिकन्या ]

कल्पकतेचा स्वामी–वाग्देवीचा लाल नृपा, मी. ध्रु०

अज्ञेयाचा पूर्णज्ञानी
चैतन्य जडा स्वबलें आणी
प्रवेशतों विश्वाच्या–इच्छामात्रें अंतर्यामीं. १

सहज करीं जी धरितों माती
देतों तिजला सुवर्णकांती
माझ्या कौशल्यानें–वसुंधरा ही नटली नामी. २

मीच नृपांचा नृपपददाता
चिरंतनाचा मीच विधाता
वाल्मीकचि संस्थापी–अजरामरता श्रीरघुरामीं ३

श्री. श्री. मा. भट, धुळें यांच्या संग्रहांतून.
महाराष्ट्र साहित्य-पत्रिका
वर्ष ७ वें, अंक ३ रा, शके १८५६
२७-२-१९०२



# परिशिष्ट क

[ या परिशिष्टांत ज्या कविता दिल्या आहेत त्या विनायकांच्या नांवानें प्रसिद्ध नाहींत. त्या काळीं कवितांखालीं नांव नसे. कित्येकदां 'कुणीतरी', 'एक मित्र' अशा नांवानें कविता प्रसिद्ध होई. या परिशिष्टांतील पहिली कविता विनायकांच्या 'प्रभावती' नाटकांतील पदांच्या धर्तीवर आहे. याच कवितेपुढें त्यांची 'कवि व पोपट' ही प्रसिद्ध कविता छापलेली आहे. तेव्हां ही कविता त्यांचीच असावी असा तर्क वाहतो. 'कुल आणि प्रीति' या दुसऱ्या कवितेंतील भाव उघड उघड विनायकांच्या चरित्राशीं संबद्ध आहे. तेव्हां ती त्यांचीच असावी याविषयीं संशय राहात नाहीं. 'पहिलें चुंबन' या तिसऱ्या कवितेचें साकी वृत्त विनायकांच्या आवडीचें आहे. 'गणिकोद्धार' आणि 'मोहानंतर' या आपल्या उपाख्यानांसाठीं त्यांनीं तें योजिलें आहे. त्यांतील शेवटच्या कल्पना त्यांच्या 'जोहार' या कवितेंतील कल्पनांशीं जुळणाऱ्या आहेत. तेव्हां 'एक मित्र' या नांवानें बहुधा त्यांनींच ही कविता लिहिली असावी. ]

## १. वीर व भ्याड यांच्या वल्गनेमधील अंतर

जे वीर्यशाली
जल्पना कधिं न करिति लव,
शत्रुंना दाविती शौर्य ते योग्य काळीं ॥ ध्रु० ॥
भ्याडजन सगरीं ठरति न क्षणभरी,
कृष्णमुख करुनिया जाति पळुनी,
व्यर्थ अवसान तें आणुनी वल्गना
करुनि ते; वरुनि वाक्खड्ग ढाली. ॥ १ ॥

धीररणरंगिं ते शत्रुशीं झुंजुनी
  कल्पिती संगरा पुण्ययात्रा;
वीरवर वल्गना करिति शस्त्रांतुनी,
  दंडुनी चंडरिपु भुजकरालीं ! ॥ २ ॥

मनोरंजन मार्च १९०२
  पु. ८. भा. ९



## २. कुल आणि प्रीति

[ चाल : वीरशिरोमणि सकल धनुर्धर ]

" निंद्यकुलोद्भव कशी तुला ती आवडली ? त्वन्मती—
जाहली काय तुला सोडती ! ॥ ध्रु० ॥

कोठें कुल तव ! कोठें विद्या ! कोठें कीर्ती सती !
उन्नती आलिंगी अवनती !
मिळतील कामिनी दुसऱ्या सुंदर तुला,
ज्या तुला शोभतिल उत्तम तव कुलशिला,
कां वेड्या भुलसी असल्या आपत्तिला ?
जाणुन सारें अंधपणें ही स्वीकारिसी दुर्गती ?
त्वन्मती—काय तुला सोडती ? " ॥ १ ॥

" ईशकृपेनें उच्चनीचता झाली बघ संप्रती
नसे मम हृदयीं ही अभिमती.
ती चिखलांतोनी आली वर पद्मिनी,
कीं शिंपींतोनी मोतीं तेजोगुणी,
कीं मृद्राशींतुन अमृताची वाहिनी
राज्य पृथ्विचें नको मला जरि मिळेल ती सन्मती
तिच्याविण जगणें केवळ मृती ! ॥ २ ॥

मनोरंजन डिसेंबर १८९८



## ३. पहिलें चुंबन

कामुक मन जे भाव कोंवळे हृदयपटावरि लिहितें
पहिलें चुंबन सदा ठळकसें मोर्तब त्यावरि करितें
आतां पुढची होइल सुखकर जीवितयात्रा साची,
खूण अशी ही पहिलें चुंबन पटवी विश्वासाची.
प्रेमांकुर जे बालमानसीं फुटले असती आधीं
त्यांचें जाळें विणुनी तरुणां पहिलें चुंबन बांधी.
पहिलें चुंबन प्रीतिलतेचा पहिला भर सुचवाया
शोभे पहिलें फूल विकसलें बाह्यांतर सुखवाया.
मुकें असुनिही पहिलें चुंबन बोले अर्थ गभीर
प्रेमोत्कटता व्यक्त करूनी प्रेमिमना दे धीर
आणभाकही परस्परांची पहिलें चुंबन होय
एकव्रततरु लाभे येणें शुभप्रीतिचें तोय.
काम रसरसे सर्वांगीं जैं होतें चुंबन पहिलें
प्रणयिजन खरे पूर्ण अनुभवी सात्त्विक विकार सगळे
बालक करितें अकपट-लीला तन्मय होउनि सगळ्या
ती तन्मयता अकपटताही वसे चुंबनीं पहिल्या
चक्रवाकसम विरहभीरुता चुंबन पहिलें आणी
वियोगशंकों विव्हलमन जणुं काय टोंचिलें बाणीं !
पहिलें चुंबन प्रियकर ओष्ठां प्रेमामृत जैं पिववी
एकव्रतता भंग पाप नच यांत मुळीं हा नयवी.

सौख्यरवीच्या कुशल सारथे प्रथम चुंबना सखया !
संसारांतिल धन्यधन्यतम सुदिन आणिशी उद्या.
विरहागम जैं निष्ठुरतेनें बळेंचि हांकी दूर
ओंठ कोडगे प्रियाधरामृत पानीं असतां चूर.
'शेवटचा हा' म्हणत शेवटीं एक घेइ जैं घुटका
पहिलें चुंबन सुखनिधि साचा लावि जरी तैं चटका.
प्रथम चुंबना, शब्दीं गातां शिणेल वाणी खास
तीव्र रसें तव शीघ्र होय जो अंगीं सौख्यविकास.

'एक मित्र'

मनोरंजन १ सप्टें. १९००
वर्ष ६ वें. भाग ३ रा



# कवितांवर टिपा

| क्रमांक | |
|---|---|
| १ व ४३ ते ६६ | हीं प्रभावती नाटकांतील पदें आहेत. |
| ३ | १८९८ सालीं धुळ्यास प्लेग असतांना गांवाबाहेर झोंपड्यांत गणेशोत्सव झाला. त्यावेळीं ही कविता रचली आहे. या कवितेंतील ' तिलक ' व ' चांफा ' हे शब्द द्व्यर्थी आहेत. 'तिलक' म्हणजे एक पक्षीं ' लोकमान्य टिळक ' आणि दुसऱ्या पक्षीं ' गंधाचा टिळा '. ' चांफा ' म्हणजे एक पक्षीं त्या नांवाचें ' पुष्प ' व दुसऱ्या पक्षीं दामोदर चाफेकर ! यांना रँडच्या खुनाबद्दल फांशीं जावें लागलें. याच सुमारास कापडावर कर बसला होता आणि पंजाबांत एका गोऱ्यानें एका हिंदी अबलेवर बलात्कार केला होता. त्यांचाहि उल्लेख या कवितेंत आहे. |
| ४ | श्रीशंकराचार्यांच्या ' परापूजे ' चा प्राकृत अनुवाद. पुण्यास हा एका मठांत पाठांतरांत आहे. |
| ६ व ११ | १८९६ पासून महाराष्ट्रांत शिवजयंतीचा उत्सव साजरा होऊं लागला. त्याचा परिणाम म्हणजे या कविता होत. |
| ७ | तिसऱ्या कडव्यांतील त्या काळची समजूत आतां ऐतिहासिक पुराव्यानें खोटी ठरली आहे. |
| ८ | History repeats itself या तत्त्वाचा उच्चार. |
| ९ | हृतभागिनी म्हणजे परतंत्र हिंदभूमि. सहाव्या चरणांत हिंदु व मुसलमान आणि मवाळ व जहाल यांच्या भांडणावर कटाक्ष आहे. |
| १३ व १५ ते २० आणि २३ ( २ ) | ' भारतास भूषणभूत झालेल्या स्त्री-रत्नांचा इतिहास मुलीबाळींच्याहि तोंडीं बसावा ' म्हणून हीं गाणीं मुद्दाम रचलीं आहेत. १९ व्या गाण्यांत ' तोडा ' बद्दल ' थोया ' पडलें आहे. ' तोडा ' गांवाचें नांव आहे. |

१४ Leigh Hunt च्या Abou Ben Adam and the Angel ला चढवलेला हा मराठी वेष आहे.

२१ या उपाख्यानाला Byron च्या ' आल्प दि रोनिगेड ' चा थोडा फार आधार आहे.

२२ याच कथानकावर रवींद्रनाथ टागोर यांची ' अभिसार ' ही बंगाली कविता आहे. श्री. साळी यांनीं तिला तामीळ रूप दिलें आहे. त्याचें मराठी भाषांतर नोव्हेंबर १९३७ च्या ' विहंगमां ' त आहे. विनायकांचें उपाख्यान स्वतंत्र तर आहेच, परंतु अधिक सरस व सुंदर आहे.

२४ श्रीधराच्या ' पांडवप्रतापां ' त ५९ व्या अध्यायांत ही कथा आली आहे. कथासूत्रांत 'आप बि तीं' व 'पर बि तीं' हे हिंदी प्रयोग ' स्वतःवर व दुसऱ्यावर ओढवलेला प्रसंग ' म्हणजे ' स्वानुभव ' आणि ' परानुभव ' या अर्थीं आले आहेत.

२६ या कवितेचा विषय प्रवृत्ति व निवृत्ति हा आहे.

२७ (१) व (२) आणि ३१ } या कविता ' दसरा ' या एकाच विषयावर आहेत. दसऱ्याच्या दिवशीं कवितेच्या रूपानें ' सोनें ' पाठविण्याचा विनायकांचा परिपाठ होता असें दिसतें. कारण अशाच प्रकारें त्यांनीं धरणगांवहून १७–१०–१९०४ रोजीं आपले कनिष्ठ बंधु दत्तात्रय जनार्दन करंदीकर, पोलीस जमादार, एदलाबाद, यांना पाठविलेलें ३१ व्या कवितेचें हस्तलिखित अलिकडे उपलब्ध झालें आहे. या हस्तलिखितांत आरंभीच्या ध्रुपदांत ' अघटित ' बद्दल ' न कळे ' असा पाठ आहे. आणि तिसऱ्या कडव्यानंतर पुढील कडवें अधिक आहे; —

सुलोचनापति दैवविलासें
मरून पडला समरीं हांसे
निधनाहातीं पडे सोडवी सावित्री स्वपती।

हस्तलिखित कवितेवर 'वारीं जावो रे सावरिया' ही चाल दिली आहे. आणि शेवटीं पुढील इंग्रजी मजकूर आहे;—

I regret the meter though sweet, you cannot enjoy without me.

V. K.

यावरून विनायक गोड गात असें दिसतें.

२८ ही कविता म्हणजे १९०६ सालच्या राजकीय परिस्थितीवर एक प्रकारची व्याजोक्ति आहे. या वेळेस 'रुसो-जपान युद्ध' चालू होतें. या कवितेंतील हिरवी सोंगटी म्हणजे रशिया, पिवळी म्हणजे जपान, लाल म्हणजे ग्रेट ब्रिटन आणि काळी म्हणजे हिंदुस्थान होय. अधिक माहितीसाठीं काव्यरत्नावलि, एप्रिल १९२२ पाहा.

२९, ३० व ३७ या तिन्ही कवितांत विनायकांनीं तत्कालीन अरसिक जनतेबद्दल त्राग्याचे उद्गार काढले आहेत. ३० व्या कवितेंतील 'गुलाब पुष्पें व्यर्थ विकसतीं' इ.–हा चरण Gray च्या Elegy मधील Full many a gem etc. या चरणावरून सुचला आहे. "चल जाऊं आपण सखया ये ये पुरा" याबद्दल 'दोघे पुरा' असा पाठभेद आहे.

३२ मनोरंजनांत या कवितेचें नांव 'सर्कशींतील सिंह' असें आहे. आणि 'कपट्यांच्या' याबद्दल 'मनुजांच्या' असा पाठभेद आहे.

३८ मनोरंजनांत या कवितेला 'स्त्री आणि पुष्प' असा मथळा आहे. तोहि अन्वर्थक आहे. कारण या ध्वनिकाव्यांत ज्याप्रमाणें 'स्त्री आणि पुरुष' यांच्यांतील विरोध व्यक्त केला आहे; त्याचप्रमाणें, 'स्त्री आणि पुष्प' यांच्यांतील साम्यहि प्रकट केलें आहे.

४२ ही कविता विनोदी दिसली, तरी शेवटच्या कडव्यांत खोंच

आहे. ती एक श्रीमंत एका काळ्या ढुस वेश्येच्या पोरीवर भाळले त्यांस उद्देशून आहे. [ पाहा, काव्यरत्नावलि, एप्रिल १९२२ ]

५५ या कवितेसारखीच एक कविता कै. अनंततनय यांनीं आरंभीं विनायकांचें जें चरित्र जोडलें आहे त्यांत आहे. ती कै. शि. म. परांजपे यांस उद्देशून आहे. अशीच एक कविता 'रामदास रामदासी' भाग ५० सर ५ मणी ६ मध्यें आहे. 'देशभक्ताचा अपूर्व सोहळा' या कवितेची पूर्वतयारी तींत दिसते; --

देशभक्ताची पूजा

बंदिशाला वंद्य मानिती, पूजिती कोंडिती देशभक्तां जिथें
शूलावरी देशभक्तांस देती जयस्तंभ लोकांस ते
होमीं चिता देशभक्तां, तिचें मानिती भस्म संरक्षिते
देशभक्तां गाऊनीया झाले कवि धन्य ते.

६९ ही कविता पत्नीस अनुलक्षून आहे. तींत विनायकांनीं आपल्या व्यसनाचा व हट्टीपणाचा कबुलीजबाब दिला आहे. व्यक्तिगत (personal) कविता या दृष्टीनें तिचें महत्त्व आहे.

७१ व ७२ हीं गीतें अनुक्रमें शिवाजी व गणपति यांच्या उत्सवाप्रीत्यर्थ रचलीं आहेत. त्यांवरून विनायक सार्वजनिक कार्यांत कसा भाग घेत तें दिसतें.

७३ ही कविता म्हणजे H. W. Longfellow च्या The Psalm of Life चें रूपांतर आहे.

---

# विनायकांची कविता

## चरित्र, चर्चा व अभ्यास

| | | |
|---|---|---|
| १ | आधुनिक कविपंचक | श्री. ग. त्र्यं. माडखोलकर पृ. ८७—१११ |
| २ | काव्यचर्चा | प्रा. ना. के. बेहेरे पृ. ३१७—३२४ |
| ३ | वि. ज्ञा. विस्तार पु. ५२ अं. १०, १९२१ | प्रो. लक्ष्मण गणेशशास्त्री लेले |
| ४ | नवजीवन, फेब्रुवारी १९३२ | प्रो. द. सी. पंगु |
| ५ | सत्यकथा, जानेवारी १९५३ | प्रा. म. श्री. पंडित |
| ६ | अभिनवकाव्यमाला भाग २ | कै. ना. वा. टिळक |
| ७ | अभिनवकाव्यमाला भाग ३ (कै. बलवंत जनार्दन करंदीकर यांची 'कवितेचा निरोप' आणि कै. ल. ना. फडणीस यांची 'विनायकास' या कविता). | कै. न. चिं. केळकर |
| ८ | काव्यरत्नावलि डिसें. १८९९ जुलै १९११ एप्रि. १९२२ | कै. ना. न. फडणीस |
| ९ | मनोरंजन, डिसें. १९०२ (कै. बलवंत ज. करंदीकर यांची 'वेडा कोण' ही कविता) | कै. का. र. मित्र |
| १० | चित्रमयजगत् मार्च १९२० (श्री. मा. के. काटदरे यांची शुकविनायका ही कविता) | कै. वासुकाका जोशी |

